# नवभारत

वर्ष ८ वें ] जुलै १९५५ [ अंक १० वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका

















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






## ‘ नवभारत ’ निधि

# -- विनंति --

‘ नवभारत ’ मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ‘ नवभारता’च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. बा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

‘ नवभारत ’ निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तर प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु देणगी देणारांस ‘ नवभारत ’ मासिक दहा वर्षें मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ‘ नवभारत ’ निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

‘ नवभारत ’ निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

‘ नवभारता’च्या गेल्या म्हणजे जून १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्रीमंत राजेसाहेब ( सांगली ) | १०० |
| श्री. भाऊसाहेब हिरे ( मुंबई ) | १०० |
| सौ. नलिनीबाई डहाणूकर ( मुंबई ) | १०१ |
| डॉ. द. गो. काणे ( नंदुरबार ) | १०० |
| श्री. रतनचंद कोटेचा ( बीड ) | १०० |
| श्री. ह. वि. पाटसकर ( दिल्ली ) | १०० |
| श्री. के. व्ही. कर्डिले ( वल्लभविद्यानगर ) | १०० |
| | ७०१ |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | २३६७ |
| एकूण | ३०६८ |

‘ नवभारत ’ निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. ग. वेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

‘ नवभारत ’ निधि-समितीचें कार्यालय C/O ‘ नवभारत ’ मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या “ खजिनदार, ‘ नवभारत ’ निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ ” या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष)

२५।६।१९५५ कृ. ना. फडके } कार्यवाह
पुणें ४ मा. प. मंगुडकर }

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें
अंक दहावा

# नवभारत

जुलै १९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )






# 'नवभारत' मासिक, जुलै १९५९

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्यावेळीं दिला आहे — कां. सं. ]

**श्री. नरहर कुरुन्दकर** ( वसमतनगर ) – साहित्यशास्त्र आणि तत्त्वज्ञान यांचे व्यासंगी. ' मराठवाडा ' ' प्रतिष्ठान ' इत्यादि नियतकालिकांतून स्फुट लेखन

**श्री. राम शेवाळकर** एम्. ए. – वाशीम ( म. प्र. ) येथील सरकारी हायस्कूलमध्यें शिक्षक

**प्रा. द. सी. पंगु** – बेळगांव येथील ' राणी पार्वतीदेवी कॉलेज 'मध्यें मराठीचे प्राध्यापक. सामराजकृत ' वच्छहरण ', विठ्ठलकृत ' सीतास्वयंवर ', मुक्तेश्वरकृत ' सभापर्व ', ' वनपर्व ' इत्यादि प्राचीन काव्यांच्या पाठशुद्ध सटीप आवृत्त्यांचे संपादक. ' आस्वाद ', ' तुषार ' इत्यादि टीकालेखसंग्रहाचे लेखक.

**श्री. चंद्रोदय भट्टाचार्य** – अमळनेर येथील ' तत्त्वज्ञानमंदिर ' या संस्थेंत गेलीं १४ वर्षें फेलो. ' Philosophical Association ' या संस्थेचे अध्यक्ष. श्री. निर्मलकुमार बसु यांच्या ' गांधीचरित ' या बंगाली पुस्तकाचा मराठी अनुवाद श्री. भट्टाचार्य व श्री. वा. ना. जठार यांनीं केला असून तो ' गांधीजींची जीवननिष्ठा ' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे.

**श्री. वा. ना. जठार** – अमळनेर येथील प्रताप हायस्कूलमध्यें शिक्षक. अमळनेर येथील ' आंतरभारती'चे कार्यवाह.

**श्री. ' रामकुमार ' ऊर्फ द. रा. किल्लेकर** – बेळगांव येथें शिक्षक. मराठी नियतकालिकांतून कविता प्रसिद्ध होत असतात.

**श्री. गं. दे. खानोलकर** ( मुंबई ) – ' माधव ज्युलियन् ', ' प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर ', ' श्रीपाद कृष्ण कोल्हटकर' इत्यादि चरित्रांचे लेखक. यांच्या 'अर्वाचीन मराठी वाङ्मय-सेवक ' या पंचखंडात्मक ग्रंथांपैकीं तीन खंड प्रसिद्ध झाले आहेत. – प्रा. शेजवलकरांच्या ' प्रगति ' या साप्ताहिकाचे हे उपसंपादक होते. सुप्रसिद्ध ' प्रतिभा ' या पाक्षिकाच्या आद्य संस्थापक–संपादकांपैकीं हे एक होते.

---


* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

प्रा. अ. ना. देशपांडे यांच्या लेखांतील कांहीं चर्चास्थळें : श्री. नरहर कुरुन्दकर

# कांहीं साहित्यशास्त्रीय प्रश्न

प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं गेल्या वर्षांतील मराठींतील टीकावाङ्मयाचा घेतलेला परामर्श 'नवभारता' च्या मार्च व एप्रिल १९५५ या दोन अंकांतून प्रसिद्ध झालेला आहे. हा आढावा घेतांना त्यांनी जे साहित्यशास्त्रीय प्रश्न उपस्थित केले आहेत त्यांपैकीं कांहींची चर्चा करणें हा या लेखाचा हेतु आहे.

श्री. दि. के. बेडेकर यांची प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं तोंड भरून स्तुति केली आहे. मीहि त्यांत सहभागी आहे. कलेचें मर्म उकलवून दाखवितांना बेडेकरांनीं जी द्वंद्वाची कल्पना मांडली आहे ती मोलाची असून निश्चित तात्त्विक अधिष्ठान असणारी ही मीमांसा मराठी साहित्यशास्त्राच्या कक्षा विस्तृत करणारी आहे यांत शंका नाहीं.

कलानिर्मितीची मानसिक प्रक्रिया सांगतांना बेडेकर म्हणतात : " मन हें मुळांत आत्मनिष्ठ असूनहि तें वास्तवाशीं तादात्म्य पावून त्याचा आकार घेवूं पाहतें. उलट वास्तव हें आपली बाह्यार्थाची स्थिति सोडून कविमनाच्या आकाराचा आशय बनूं पाहतें. या परस्पर प्रतिक्रियेंतून कलाकृति निर्माण होते. कलेच्या निर्मितींत अशा रीतीनें, व्यक्तित्व व वास्तव यांचें द्वंद्व असतें. " आपण हें द्वंद्व गृहीत धरूं. मार्क्सच्या द्वंद्वांत किंवा खरें म्हणजे द्वंद्वात्मक स्वयंगतींत, एक सतत गतिमान् , वर्धिष्णु आणि विकासक्षम वस्तु सतत विकास पावत असते. या विकासाच्या पोटीं असणारीं त्या वस्तूच्या विनाशाचीं बीजेंहि सतत विकास पावत असतात. एक टप्पा असा येतो जेथें त्या वस्तूचा विकास थांबतो आणि सतत वाढणाऱ्या विनाशक शक्ती त्या वस्तूचा नाश करून नवी वस्तू निर्माण करतात. बेडेकरांना हें मार्क्सचें द्वंद्व अभिप्रेत आहे असें गृहीत धरून, व्यत्यास-पद्धतीनें विचार केला तर कांहीं विपरीत मुद्दे सिद्ध होतात. ( १ ) मनाचा सतत विकास होतांना ज्या मनोनाशक शक्ती वाढत असतात त्या कलाकृतीच्या निर्मितीचें कारण असतात. ( २ ) कलाकृतीच्या बुडाशीं असणारें द्वंद्व व्यक्तित्व व वास्तव यांत नसून कलाकृति आणि व्यक्तित्व यांत असतें. – हेगेलच्या हेतुवादी द्वंद्वांत एकाच सत्तेंतील दोन वस्तूंचें द्वंद्व असतें. त्यापैकीं एकीला ' थीसिस ' आणि दुसरीला ' अँटिथीसिस ' असें नांव आहे. या दोन वस्तू परस्परविनाशक आणि परस्पराश्रयी असतात. त्यांच्या संघर्षांतून दोन्हींचा नाश होतो आणि तिसरी सर्वस्वीं निराळी अशी वस्तु निर्माण होते ही ' सिंथेसिस ' होय. बेडेकरांना हें द्वंद्व अभिप्रेत आहे असें म्हटलें तर तीन विपरीत मुद्दे सिद्ध होतात : ( १ ) द्वंद्वांच्या दोन्ही कोटी सापेक्ष असतात. तेव्हां व्यक्तिनिरपेक्ष वास्तवाला अस्तित्व नाहीं. ( २ ) ज्या अर्थीं व्यक्तित्व आणि वास्तव यांच्यांत द्वंद्व आहे त्या अर्थीं तीं दोन्हीं एकाच सत्तेचीं विषय आहेत. म्हणजे एक तर व्यक्तित्व जाणीवशून्य आहे किंवा वास्तव जाणीवपूर्ण आहे ! वास्तवहि आणि व्यक्तित्वहि जर 'रिअल' तर मग कलाकृतीलाहि 'रिअल'च म्हणावयास काय हरकत आहे ? ( ३ ) द्वंद्वांतून निर्माण होणारी तिसरी वस्तु द्वंद्वाच्या दोन्हीं कोटींपेक्षां निराळी असते म्हणून कलाकृतीवरून वास्तव किंवा व्यक्तित्व यांचा अंदाज घेणें चूक होय ! – द्वंद्वविचाराची तिसरी दिशा सांख्यांची आहे. पण ती बेडेकरांना अभिप्रेत नाहीं हें मी जाणतों. मुळांत मार्क्स आणि हेगेल यांच्या द्वंद्वविचारांत कांहीं चूक आहे काय हा प्रश्न जरी बाजूला ठेवला तरीहि बेडेकरांना जें हवें आहे तें यावरून सिद्ध होत नाहीं. गणिताचा एक नियम हा कीं जेव्हां विपरीतसिद्धि होते तेव्हां गृहीत चूक समजावें. आपण द्वंद्व गृहीत धरलें होतें.

व्यतिरेकपद्धतीनें कलानिर्मिति काय नाहीं हें पाहणें जसें आवश्यक आहे तसें अन्वय-पद्धतीनेंहि तें पाहणें आवश्यक आहे. मुळांत द्वंद्व आहे हें गृहीत धरण्याइतका पुरावा बेडेकरांनीं दिलेला नाहीं. आत्मनिष्ठ मन वास्तवाशीं तादात्म्य पावून त्याचा आकार घेवूं पाहतें म्हणजे काय ? आणि वास्तव बाह्यार्थाची स्थिति सोडून कविमनाच्या आकाराचा आशय बनूं पाहतें म्हणजे तरी काय ? बेडेकरांनीं हें स्पष्ट करण्यासाठीं शिल्पकलेचें उदाहरण दिलें आहे. ' निराकार मनांतील विकारांना शिल्पांत आकार मिळतो आणि निर्विकार दगडाला विकार प्राप्त होतात.' हें त्यांचें स्पष्टीकरण हेत्वाभासा-








त्मक आहे. श्री बाक्रे यांनीं कृष्णजी आरांचा एक बस्ट तयार केला आहे. समजा, त्यांनीं बस्टऐवजीं पोर्ट्रेट तयार केलें असतें तर ? दगड, छिनी, हातोडा यांची जागा कॅनव्हॉस व ब्रशनें घेतली असती, आकार या माध्यमाची जागा रंग व रेषांनीं घेतली असती. बाक्रेच्या बस्टमधील वास्तव दगड नसून स्वतः आरा वास्तव आहेत. बाक्रेच्या व्यक्तित्वानें आराशीं तादात्म्य पावणें आणि आरांनी बाक्रेच्या मनाचा आशय होणें या दोन्हिचाहि अर्थ, बाक्रेला झालेला आरांचा साक्षात्कार इतकाच आहे. कलानिर्मितीची प्रक्रिया सांगतांना अनुभवाची उत्कटता म्हणजे कला यापेक्षां खरोखर बेडेकरांनीं जास्त कांहीं सांगितलेलें नाहीं आणि केवळ अनुभवांची उत्कटता हें कला निर्मितीचें अपुरें दर्शन आहे.

काव्य, संगीत चित्र, शिल्प, वास्तु या प्रमुख पांच कलांपैकीं वास्तु व संगीत या कलांचा विषय वास्तव हा नाहीं. कलास्वरूपशास्त्राचा एक भाग असणाऱ्या साहित्यशास्त्राची कलाकृतीचें मर्म उकलून दाखविणारी बेडेकरांची ही मीमांसा कलास्वरूपशास्त्राला अव्याप्त ठरविणारी आहे. बेडेकरांच्या लिखाणाचें आणि मीमांसेचें बहुमूल्यत्व मान्य करूनहि, कलास्वरूप-शास्त्रांतील साऱ्याच मीमांसांच्या भाळीं असणारे तीन दोष (१) विपरीतसिद्धि (२) अपुरेपणा (३) अव्याप्ति— हे याहि मीमांसेच्या ललाटीं आहेत कीं काय ही शंका रहातेच !

हेगेल हेतुवादी असल्यामुळें त्याला द्वंद्वाच्या परि-भाषेंत सौंदर्य म्हणजे काय याचें उत्तर देतां आलें. बेडेकरांना मात्र ते जडवादी असल्यामुळें तें शक्य झालें नाहीं. कलेचें कार्य कोणतें याचें उत्तर बेडेकर 'सौंदर्यनिर्मिति' असें न देतां 'नवनिर्मिति' असें देतात. लोखंडी नांगर ही जड आणि लग्नसंस्था ही काल्पनिक असली तरी त्या दोन्ही नवनिर्मिती आहेत. साऱ्याच नवनिर्मिती व्यक्ति आणि वास्तव यांच्या संबंधांतून निर्माण होतात. मग कलेचें व्यवच्छेदक लक्षण कोणतें ? 'अर्थरूपांची निर्मिति हें कलेंतील नवनिर्मिती-चें स्वरूप आहे' हें उत्तर नवे हेत्वाभास निर्माण कर-णारें आहे. नांगरांत सुद्धां लोखंड अर्थपूर्ण झालें आहे. शिवाय अर्थरूप म्हणजे काय ? तें कसें निर्माण होतें ? माध्यमाचें, साधनसाहित्याचें किंवा वास्तवाचें अर्थरूप निर्माण होतें कीं त्या वास्तवाशीं निगडित असणाऱ्या व्यक्तित्वाचें म्हणजे मनोविकारांचें होतें ? या साऱ्यांचीं समाधानकारक उत्तरें बेडेकरांनीं अजून दिलेलीं नाहींत. कलेंत जें अर्थरूप निर्माण होतें ते नुसत्या वास्तवाचें नव्हे, तसेंच नुसत्या व्यक्तित्वाचेंहि नव्हे आणि अर्थनिर्मिति म्हणजे नुसती नवनिर्मिति नव्हे. तर नवसौंदर्यनिर्मिति. अनुराधापुरमूची बुद्धमूर्ति म्हणजे गौतमबुद्ध या वास्तवाचेंच नव्हे तर त्याच्या मुखावर असणाऱ्या प्रसन्न शांतीचेंहि अर्थरूप आहे. या दोन्ही अर्थरूपांनीं मिळून एक एकजीव असा उत्कट अनुभव साकार केला आहे आणि तो सौंदर्य-प्रत्यय देणारा आहे.

ज्ञान, नीति आणि कला या तीनहि क्षेत्रांत काम करणाऱ्यासमोर एकच वास्तव असतें असें बेडेकर यांचें मत असल्याचें प्रा. अ. ना. देशपांडे सांगतात. एका अर्थी हें बरोबर आहे. ज्ञानाच्या क्षेत्रांत वास्त-वाशीं असणारा संबंध तार्किक आणि वस्तुनिष्ठ असतो. नीतीच्या क्षेत्रांत कृती आणि हेतू महत्त्वाचे ठरतात. कलेच्या क्षेत्रांत मात्र प्रत्ययांशीं संबंध असतो. नीति आणि ज्ञान या क्षेत्रांत वास्तवाशीं तादात्म्य पावण्याची गरज नाही. यामुळें ज्ञान, नीति आणि कला यांच्या समोर एकच वास्तव असतें हा मुद्दा गौण ठरतो.

बेडेकरांच्या मीमांसेवर अशा शंका प्रदर्शित केल्या-नंतर त्यांची करुणरसमीमांसा बिनतक्रार मान्य करणें कठीण आहे. मानवाला पूर्णतेकडे नेणारें उदात्त वेड हें ट्रॅजेडीच्या नायकाचें सर्वांगीण स्वरूप नसून, महा-मानवाची आत्मनाश करणारी क्षुद्र अगर उदात्त चूक हा त्याचा अव्याप्त भाग आहे. क्रूर नियतीनें केलेला सामान्य पण साध्या माणसाचा चुराडा हेंहि ट्रॅजेडीचेंच स्वरूप असून ते नायकनिष्ठ नाहीं. मनाला सुन्न कर-णारीं, व्यक्तित्वाला पूर्णत्व आणणारीं, स्वतःची अनुकंपा करण्यास शिकविणारीं शॉचीं 'तुफान विनोदी (?)' नाटकें वाचून तर ट्रॅजेडीबाबत माझ्या मनांत एकच गोंधळ उडाला आहे.

सर्वसामान्य मीमांसांच्या अंगीं असणाऱ्या तीन दोषांची व या मीमांसेच्या खास उणीवांची जाणीव जरी मला असली तरी सामाजिक आणि ऐतिहासिक पद्धतीच्या जबाबदार वाङ्मय-विवेचनाला मात्र बेडे-करांनींच आरंभ केला आहे असें माझें मत आहे.



अनुक्रमणिका






डॉ. केतकर यांनीं वैदिक वाङ्मयाचें समालोचन करतांना जी दृष्टि वापरली आहे ती समाजशास्त्रीय व इतिहासविषयक संशोधनाची आहे. व्यक्ति या एकांकाचे इतर व्यक्ती, कुटुंब व समाज इत्यादींशीं असणारे संबंध आणि त्यांचें विचार-विश्व यांची गोळाबेरीज करणें याला डॉ. केतकर सामाजिक दृष्टि म्हणत. अमुक कालखंडांत अमुक एक घटना घडल्याचा अंदाज करण्याइतपत पुरावा गोळा करणें हें त्यांच्या ऐतिहासिक दृष्टीचें स्वरूप आहे. वेडेकर समाज हा एकांक मानतात आणि ऐतिहासिक दृष्टि या शब्दांचा अर्थ स्वयंगतिनिष्ठ इतिहासवाद असा करतात. मार्क्सिस्ट परिभाषेशीं प्रा. अ. ना. देशपांडे यांचा फारसा परिचय दिसत नाहीं. नाहींतर त्यांनीं सामाजिक व ऐतिहासिक दृष्टीचें श्रेय वेडेकरांना न देतां केतकरांना देण्याची चूक केली नसती.

वेडेकर यांच्या द्वंद्वमीमांसेनें अपूर्ण रीत्या उलगडलेलें सौंदर्याचें कोडें वेगळ्याच दिशेनें उलगडतांना मर्ढेकरीय कलामीमांसा निर्माण झाली आहे. समजा – अनुराधापूरमची बुद्धमूर्ति मी पाहिली आणि मत दिलें : 'ही मूर्ति सुंदर आहे.' सौंदर्यविषयक अनुभव ज्यांत ग्रथित केला आहे असें हें एक विधान आहे. दिसण्यांत जरी तें वस्तुनिष्ठ दिसत असलें तरी वस्तुतः तें आत्मनिष्ठ आहे. या विधानाचा खरा अर्थ "मला आज येथें आतां ही मूर्ति सुंदर वाटते." असा आहे. कोणतेंहि सौंदर्यविषयक विधान वर्णनात्मक ज्ञानावर आधारतां येत नसून तें प्रत्ययावरच आधारावें लागतें हें स्पष्ट करून मर्ढेकर पुढें विचारतात : "एका आत्मनिष्ठ विधानाकडून एका शास्त्रीय वस्तुनिष्ठ विधानाकडे जाण्याचा मार्ग कोणता म्हणजे ही मूर्ति सुंदर आहे या धर्तीचें खरेंखुरें विधान शक्य होईल ?" प्रथमतः 'आज' 'इथें' 'आतां' हे शब्द गाळण्यासाठीं सौंदर्य आणि आनंद यांची फारकत करणें आवश्यक आहे. आनंद हा 'आज' 'इथें' 'आतां' या स्वरूपाचा असल्यामुळें आज जी कलाकृति आहे ती उद्यां नाहीं असा निर्णय येणें शक्य असतें. यानंतर आशय आणि विषय यांना सौंदर्यांतून गाळणें आवश्यक आहे; कारण विषय हा त्या विशिष्ट कलाकृतीचा स्वतंत्र असतो. सौंदर्याच्या व्याख्येंत विषयाचा समावेश झाला कीं ती व्याख्या फक्त त्याच कलाकृतीला लागूं होते. आणि आशयाचा समावेश झाला म्हणजे ती व्याख्या माझ्यापुरती लागू होते इतरांना ती अव्याप्त राहते. तिसरी जी बाब गाळावयाची ती म्हणजे माध्यम किंवा मर्ढेकरांच्या भाषेंत साधनसाहित्य. कारण साधनसाहित्य दर कलाप्रकाराचें निराळें असतें. मर्ढेकरांना सौंदर्याचें स्वरूप स्पष्ट करतांना ज्या तात्त्विक अपरिहार्यतांना तोंड द्यावें लागलें त्यांत मूलभूत चूक दाखविणें शक्य आहे. पण त्या तात्त्विक अपरिहार्यता स्वीकारल्यानंतर त्यांच्यापेक्षां निराळी अशी व्याख्या करणें अशक्य आहे. या पायरीवर संवेदनांच्या खेरीज इतर कांहींहि उरत नसल्यामुळें "विशिष्ट इंद्रियाला येणारा संवेदनांचा लय-प्रत्यय म्हणजे सौंदर्य" अशी त्यांची व्याख्या आहे. ज्यांना मर्ढेकरांची ही मीमांसा पटत नाही त्यांनी इतका साधकबाधक विचार करून नवी मीमांसा मांडली पाहिजे. प्रा. अ. ना. देशपांडे यांच्याप्रमाणें, मर्ढेकर जीवनविन्मुख आहेत असा आक्षेप घेणें सोपें असलें तरी तो साहित्यशास्त्रीय चर्चेचा मार्ग नव्हे.

वेडेकरांच्या मीमांसेप्रमाणें मर्ढेकरीय मीमांसेला ते तीन सुप्रसिद्ध दोष लागू आहेत. या मीमांसेंतला संवेदना हा शब्द घोटाळा करणारा आहे, कारण संवेदना वस्तुनिष्ठ नसून आत्मनिष्ठ असतात. आपलीं सारीं ज्ञानेंद्रियें स्मृतिसंचयाशीं अपरिहार्यपणें इतकीं निगडित आहेत की रसेलनें संवेदनांना जवळजवळ अनुमानप्रमाण ठरविलें आहे. संवेदनांचा लय-प्रत्यय म्हणजे सौंदर्य ही व्याख्या गृहीत धरली तर सौंदर्य हा कलाकृतींचा खास गुणधर्म नसतो अशी विपरीतसिद्धि होवून कलांचें व्यवच्छेदक लक्षणच नाकारलें जातें. या मीमांसेचा अव्याप्तीचा दोष हा कीं काव्यकलांतर्गत सौंदर्याचा उलगडा या मीमांसेनें होत नाहीं. श्री. मर्ढेकरांनाहि या आपत्तीची जाणीव असल्यामुळें त्यांनीं वाङ्मय ही निकृष्ट कला ठरविली आहे. काव्याचें इतर मोल कांहींहि असलें तरी त्याचें सौंदर्यमूल्य बेताचेंच असतें असें ते म्हणतात. काव्यकलेंतील सौंदर्याचा शोध मर्ढेकरांनीं केला आहे. पण काव्याची महात्मता मात्र त्यांनीं इतरत्र सांगितली आहे.

साहित्यावर विचार करतांना मर्ढेकर म्हणतात कीं वाङ्मय आणि सौंदर्यशास्त्र यांचा संबंध नेहमी शब्दांच्या अर्थाच्या द्वारें येतो. शब्द दोन प्रकारचे असतात :










अर्थ स्थिर असणारे – उदाहरणार्थ झाड, दगड, आणि, व इत्यादींसारखे. व संदर्भाप्रमाणें ज्यांचे अर्थ बदलत असतात असे – उदाहरणार्थ, एकटी, भयंकर, लाडकी इत्यादींसारखे. कवीचा अनुभव, वाङ्मयाचा सौंदर्यशास्त्राशीं असणारा संबंध दोन्हीहि या दुसऱ्या प्रकारच्या शब्दाशीं निगडित असतात. सारीं क्रियापदें, क्रियाविशेषणें, भाववाचक नामें आणि केवलप्रयोगी अव्ययें दुसऱ्या प्रकारचे शब्द आहेत. या शब्दांनीं जो सुसंगत आणि लयकारी अर्थबंध निर्माण होतो त्याचा प्रत्यय म्हणजे सौंदर्य. मात्र वाङ्मयाची महात्मता सौंदर्यांत नसून, सौंदर्य वाङ्मयांत गौण व किमान आवश्यक आहे. मर्ढेकरांनीं वाङ्मयीन महात्मता ठरवितांना तीन प्रश्न विचारले आहेत : (१) आलेल्या अनुभवाशीं कलावंतानें कितपत अविचल इमान ठेवलें आहे ? (२) कोणताहि उत्कट अनुभव कलावंताच्या मनांत जें काहूर निर्माण करतो त्याची व्याप्ति किती आहे ? (३) या काहूरामुळें विश्वरचनेच्या गाभ्याला तुमचा स्पर्श किती झाला आहे ? – कलाकृति हा एका व्यक्तीचा विशिष्ट क्षणींचा उत्कट अनुभव असल्यामुळें त्या अनुभवाचे सारे घटक एकजीव व सुसंगत असतात हें त्यांनीं गृहीत धरलें आहे. माधव ज्युलियनांच्या कवितेचें रसग्रहण करतांना त्यांनीं फक्त पहिला प्रश्न विचारला आहे. पण या पहिल्या प्रश्नावर वाङ्मयीन महात्मता ठरत नाहीं याची त्यांना जाणीव आहे. सुबुद्ध विचारवंताला – मग तो कलावादी असो अथवा जीवनवादी असो – ललित वाङ्मयाच्या बाबतींत तरी यापेक्षां जास्त कांहीं विचारण्याची गरज नाहीं हें पटावें. मर्ढेकर जेव्हां कलांवर बोलत असतात तेव्हां साहित्यावर बोलत नाहींत आणि जेव्हां साहित्यावर बोलत असतात तेव्हां जीवन-विन्मुखाप्रमाणें न बोलतां, जर्मन अध्यात्मवाद्यांप्रमाणें विश्वरचनेच्या गाभ्याला स्पर्श करण्याची अपेक्षा कलेकडून करतात. प्रतिगामी, पुरोगामी ही विशेषणें संगीत, वास्तु आणि शिल्प या कलांना कशी लावणार ? चित्र आणि शिल्प यांना किंचित् स्पर्श करणारीं हीं विशेषणें फक्त साहित्याला मात्र एका मर्यादेंत लागूं होतात.

प्रा. देशपांड्यांच्या 'जीवन-विन्मुख' मर्ढेकरांचा इतका विचार केल्यावर जीवन-सन्मुख कुसुमावतीबाई देशपांडे सौंदर्याबाबत काय म्हणतात तेंहि विचारांत घेतलें पाहिजे. प्रा. सौ. कुसुमावतीबाई यांनीं सुद्धां सुसंगति म्हणजे सौंदर्य अशीच मीमांसा केली आहे हें अ. ना. देशपांडे पार विसरून गेले आहेत. कदाचित् बाईंचें तें अध्यक्षीय भाषण 'पासंग' या संग्रहांत समाविष्ट नसेल. (हा संग्रह अजून मी वाचलेला नाहीं त्यांतले कांहीं लेख फुटकळपणें वाचलेले आहेत). सत्य, शिव, आणि सुंदर हीं जीवनाचीं त्रिगुणात्मक अंगें आहेत व तीं सर्व जीवनसापेक्ष आहेत. त्यांपैकीं प्रत्येकाची प्रतीति व्यक्ति-व्यक्तीला स्वतःच्या अंतरंगांच्या खोल गाभाऱ्यांत येवूं शकते; पण ही प्रतीति सांस्कृतिक संचितानें रंगलेली असते असा बाईंचा दावा आहे. अंतरंगाच्या खोल गाभाऱ्यांत प्रतीत होणारें सत्य आणि पुरावा, प्रयोग व वर्णन यांनीं सिद्ध होणारें बाहेरचें वास्तव यांत त्यांना फरकच दिसत नाहीं. सत्याप्रमाणें असत्य, वास्तवाप्रमाणें काल्पनिक हींहि जीवनाचींच अंगें आहेत इकडे त्यांचें लक्ष नाहीं. दोन भिन्न संस्कृतींचें सत्य जर भिन्न असतें तर युरोपीय संस्कृतीनें केलेला ज्ञानाचा संचय आपल्यासाठीं निरुपयोगी झाला असता. आपण मानवसंस्कृतीच्या शाश्वत मूल्यांविषयीं बोलत होतों असा युक्तिवाद पुढें येण्याची शक्यता आहे. पण मूल्य म्हणजे काय, तें कसें निर्माण होतें याची जाणीव असणारा आणि मूल्यांत सतत परावर्तन होत असतें हेंहि जाणणारा, मूल्यांवर सत्य अधिष्ठित असतें, असें म्हणणार नाहीं. कारण सत्य हा मूल्यांचा आधार आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं जीवनाचें जें ज्ञान आपण प्राप्त करून घेतों किंवा निवेदन करतों तें अनेक द्वंद्वांच्या साह्यानें. या द्वंद्वांपैकीं सत्यासत्य, भद्राभद्र, आणि सुंदरासुंदर हीं तीन सर्वमान्य आहेत. जॉन डयुई सारखे प्रॅग्मॅटिस्ट उपयोगी आणि निरुपयोगी हें द्वंद्व सत्य आणि असत्य या द्वंद्वाचें एक रूप मानतात. वास्तव आणि काल्पनिक हेंहि एक द्वंद्व आहे. खपुष्प, वंध्यापुत्र यांना जसें काल्पनिक म्हणता येईल तसें असत्य म्हणतां येणार नाहीं. ज्याला आपण व्यष्टि-समष्टिसंबंध म्हणतों ती या द्वंद्वांची निर्मिति आहे. संस्कृति ही कला, नीति, सत्य यांना जन्म देत नसून कला, नीति, सत्य हीं संस्कृतीला जन्म देतात, तिचा विकास करतात असें म्हणणें सत्या-








च्या जास्त जवळ होईल. तर्कतीर्थांसारखा कला आणि शास्त्र यांत सूक्ष्मार्थानें भेद न मानणारा कुशाग्र तत्त्वज्ञ कला संस्कृतीची रचना करते असें म्हणतो, पण रचलेली संस्कृति ही गतिमान् आहे, तिचीं मूल्यें परिवर्तनशील आहेत हें लक्षांत घेऊन कलेचें मूल्य-मापन करतांना सांस्कृतिक मूल्यें जपूनच वापरतो. ललित वाङ्मयनिर्मितीचा प्रत्यय नसणारा तत्त्वज्ञ जें तारतम्य बाळगतो तें बाईंसारखी तरल लेखणीची विदुषी मात्र बाळगीत नाहीं हा दैवाचा दुर्विलास गंमतीचा आहे. कलास्वरूपशास्त्राच्या क्षेत्रांत काव्य-मय वाक्यांनीं फार मोठी जागा अडविली आहे. कुसुमावतीबाईंची पद्धती अशीच आहे. ' सत्यं शिवं सुंदरम् ' हें जीवनाचें त्रिगुणात्मक स्वरूप आहे असें म्हणतांच पावित्र्य आणि सौंदर्य हे वस्तूचे गुण ठर-तात, इकडे लक्ष कोण देतो ?

प्रा. वा. ल. कुलकर्णी आणि त्यांचे विचार या दोन्हींवर प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं बरीच टीका केली आहे. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या मीमांसेला फारसें तात्त्विक अधिष्ठान नाहीं हेंच माझेंहि मत आहे. पण अनुदार टीका हें त्याचें उत्तर कसें होतें ? व्यक्तित्व ही सामाजिक संस्कृतीच्या प्रक्रियेची निर्मिति असून तें तिच्या प्रवाहांतला एक दुवाहि आहे यावर दुमत होण्याचें कारण नाहीं. ज्यांच्या मतें व्यक्तित्व ही मानसिक प्रक्रियांची आणि अवस्थांची संघटना आहे त्यांना सुद्धां मानसिक प्रक्रिया शून्यांत होत नसतात याची सुबुद्ध जाणीव आहे. आणि ज्या मार्क्सवाद्यांना व्यक्तित्व ही सामाजिक निर्मिति आहे असें वाटतें त्यांना सुद्धां प्रत्येक व्यक्तींत हा आविष्कार भिन्न असतो याची जाणीव आहे. अठराव्या शतकां-तील फ्रान्समधले यांत्रिक जडवादी आणि द्वंद्वात्मक स्वयंगति मानणारे मार्क्सवादी यांच्यांतलें अंतर ओळखल्याखेरीज कॉडवेल पचणार नाहीं. वा. ल. कुलकर्णी प्राध्यापक आहेत असें म्हणताना ते हिंदु आहेत हें नाकारण्याचें कारण नाहीं. तसेंच कलावंताच्या व्यक्ति-त्वाचा विचार करतांना, तो समाजाचा घटक आहे हे वा. ल. कुलकर्णी नाकारीत नाहींत. फक्त कलावंताच्या व्यक्तित्वाचा विचार करतांना तो समाजाचा भाग आहे हें सिद्ध करणाऱ्या त्याच्या व्यक्तित्वांतील घटकांपेक्षां त्याला कलावंत ठरविणारे घटक महत्त्वाचे आहेत इतकेंच त्यांचें म्हणणें आहे. या पार्श्वभूमीवरच ते कलावंताच्या स्वातंत्र्याचा विचार करतात. हा विचार करतांना आपण त्याच्यावरील खऱ्या बंधनांचा विचार करीत आहों याचीहि कुलकर्णी यांना जाणीव आहे.

प्रा. वा. ल. कुलकर्णी यांची रसविषयक भूमिका अशी आहे : कलाकृतीच्या परिशीलनानें निर्माण होणारा भावानुभव अंतर्बाह्य सुसंगत आणि उत्कट असतो. या अनुभवद्वारें आपल्या विचारशक्तीचें, भावशक्तीचें आणि सौंदर्यबुद्धीचें समाधान होतें. कलाकृतीच्या द्वारें पूर्ण होणारें हें कुतूहल सहृदयांना पुर-विण्याच्या पात्रतेचें वाटलें पाहिजे आणि ही सुसंगति सहृदयांच्या प्रत्ययास आली पाहिजे. – ही रसविषयक भूमिका त्यांच्या कलावंताच्या स्वातंत्र्याबाबतच्या कल्पनें-त अनुस्यूत आहे. प्रत्येक कलाकृतिद्वारें पूर्ण होणारें कुतूहल त्या पात्रतेचें असलें पाहिजे हें मूल्य एका अर्थी कलाबाह्य मूल्य आहे. पण कुलकर्णी यांनीं तें कलात्मक म्हणून स्वीकारलें आहे. हाच त्यांना, कलावंत समाजाचा घटक असतो याची जाणीव असल्याचा पुरावा होय. हा पात्रतेचा आग्रह त्यांच्या बाबतींत इतका कडवा आहे कीं त्या आधारें ते वा. म. जोशी यांना सर्व-श्रेष्ठ कादंबरीकार ठरवितात. कुलकर्णी यांची रसमीमांसा कशी अपुरी आहे, त्यांचीं कांहीं विधानें एकमेकां-पासून कशीं तुटक आहेत, क्वचित् परस्परछेदक आहेत याचा विचार मी सविस्तरपणें इतरत्र केला आहे. येथें इतकें लक्षांत ठेवलें म्हणजे पुरें कीं ज्या अर्थानें ब्रॅडले, गंगाधर गाडगीळ, फडके इत्यादि लोक कलावादी आहेत त्या अर्थानें कुलकर्णी कलावादी नाहींत. कुलकर्णी यांच्या मीमांसेंतला महत्त्वाचा दोष हा कीं ही मीमांसा कलाकृतीकडून किमान काय अपेक्षा आहेत हें सांगणारी आहे. कलेची महात्मता ठर-विण्यास ती निरुपयोगी आहे.

वा. ल. कुलकर्णींची रसविषयक भूमिका अशी असल्यामुळें कलावंताच्या स्वातंत्र्याबाबत लिहितांना ते असें म्हणतात कीं अनुभव जेव्हां कल्पनेच्या पातळीवर जाऊन कलात्मक होतो, तेव्हां कलावंताला त्यांत एक चित्राकृति दिसूं लागून ती प्रकट करणें त्याला अपरि-हार्य वाटतें. हा जो उत्कट अनुभव प्रकट करावया-चा तो प्रकट होण्यासाठीं कांहीं अपरिहार्य बंधनें आहेत, त्या अनुभवाबाहेरच्या इतर कशाचाहि परिणाम

होवूं न देणें हें पहिलें बंधन आहे. टीकाकार, लोक, प्रकाशक, विशिष्ट मतप्रणाली, राजसत्ता यांच्या मागण्या तर त्या अनुभवाबाहेर असतातच. पण स्वतः जमा केलेली माहिती व ज्ञान यांचा अंतर्भाव कलाकृतींत करण्याचा मोह सुद्धां त्या अनुभवाबाहेरचा आहे. म्हणून तो टाळला पाहिजे. कलावंतानें स्वतःचा चित्राकृति निर्माण झालेला अनुभव अपरिहार्य असेल तरच प्रगट करावा आणि तोच प्रगट करावा इतर कांहींहि करूं नये. कलावंताला स्वातंत्र्य पाहिजे असें म्हणताना कलावंतानें पाळलें पाहिजे असें एक बंधन कुलकर्णी त्यांवर लादीत आहेत. कलावंतावर असणारें दुसरें बंधन माध्यमाचें असतें. प्रत्येक माध्यम विशिष्ट मर्यादांत विशिष्ट प्रकारचे भावच प्रगट करूं शकतें. कुलकर्णी यांचीं या विषयावरचीं मतें कांहींशी त्यांच्या कलाविषयक भूमिकेचा छेद करून जाणारीं आहेत असें वाटतें.

कलावंताचें व्यक्तित्व सामाजिकच आहे म्हणून त्याला येणारा प्रत्येक उत्कट अनुभव त्या संस्कृतींतून उगवून तिच्यावर संस्कार करणारा असतोच. हे संस्कार मोलाचे असले पाहिजेत असा कुलकर्णी यांचा आग्रह नाहीं. ते वाईट संस्कार नसावे याबाबत मात्र ते दक्ष आहेत. कलावंतानें प्रगट केलेला अनुभव कितीहि उत्कट व सुसंगतिपूर्ण असला तरी त्याद्वारें पूर्ण होणारें कुतूहल जर पुरविण्याच्या पात्रतेचें नसेल तर ती कलाकृति आहे असें वा. ल. कुलकर्णी म्हणणार नाहींत. प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं कुलकर्णी यांच्या मताचा कसा विपर्यास केला आहे, हें यावरून दिसून येईल.

प्रामाणिकपणा ऊर्फ निष्ठा आणि संवाद ऊर्फ सुसंगति हीं दोनच मूल्यें वा. ल. कुलकर्णी प्रमाण मानतात, असें गृहीत धरून अ. ना. देशपांडे यांनीं एक चूक केली आहे. तिच्या भरीला, प्रामाणिकपणा आणि संवाद जीवनाच्या साऱ्याच क्षेत्रांत प्रमाणभूत आहेत म्हणून तीं केवळ कलामूल्यें नाहींत असें प्रतिपादन करतांना दुसरी चूक केली आहे. निष्ठा आणि संवाद हे शब्द मर्ढेकर व वा. ल. कुलकर्णी कोणत्या अर्थानें वापरतात हे त्यांनीं समजून घेतलें नाहीं. खरें म्हणजे मर्ढेकरांनीं आत्मनिष्ठा हा शब्द वापरला आहे. तत्त्वनिष्ठा, वस्तुनिष्ठा यांपेक्षां आत्मनिष्ठा निराळी आहे. कलावंताचें आपल्या उत्कट अनुभवांशीं अविचल इमान असणें या अर्थी मर्ढेकर आत्मनिष्ठा हा शब्द वापरतात. शास्त्रांत वस्तुनिष्ठा असते, नीतींत हेतुनिष्ठा असते आणि कलेंत आत्मनिष्ठा असते. संवाद किंवा सुसंगति ही दोन प्रकारची असते. 'इंडक्शन' आणि 'डिडक्शन' यांनीं नियंत्रित असलेली तर्कनिष्ठ सुसंगति व संवाद, विरोध, प्रमाणबद्धता, लय यांनीं नियंत्रित असणारी सौंदर्यनिष्ठ सुसंगति. दोघांनींहि आवर्जून सांगितलें आहे कीं त्यांना सुसंगति म्हणजे सौंदर्यनिष्ठ सुसंगति अभिप्रेत आहे. थोडक्यांत म्हणजे प्रामाणिकपणा व संवाद हे शब्द ज्या अर्थांनीं वा. ल. कुलकर्णी वापरतात त्या अर्थी तीं निर्भेळ कलामूल्येंच आहेत.

प्रा. अ. ना. देशपांडे हे क्रोचे आणि वा. ल. कुलकर्णी यांना स्थूल मानानें एकच समजतात. हा "स्थूल मानानें" शब्द धोक्याचा आहे. बेनेडेट्टो क्रोचे हा अंतःस्फूर्तिवादी तत्त्वज्ञ असून मर्ढेकर निदान या शास्त्रापुरते अविचलपणें वास्तववादी विश्वसत्याच्या भूमिकेवर स्थित आहेत. वा. ल. कुलकर्णी यांना निश्चित तात्त्विक भूमिका नाहीं. क्रोचेच्या मतें अंतःप्रेरणेनें होणारें जीवनसत्याचें कोणतेंहि दर्शन म्हणजे एका अर्थी विश्वात्म्याचेंच दर्शन; आणि तें साकार होणें हीच कलाकृति. क्रोचे सौंदर्य प्रत्ययसिद्ध आणि हेतुपूर्ण मानतो. मर्ढेकर आणि वा. ल. कुलकर्णी अंतःप्रेरणेवर विश्वास ठेवणारे नाहींत. विश्वात्म्याच्या दर्शनाचा आणि सौंदर्याचा अर्थाअर्थी संबंध नसून सौंदर्य वस्तुनिष्ठ आहे, हेतुपूर्ण नाहीं या मताचे आहेत. क्रोचेच्या मतें अंतर्मनांत साकार होणें हें कलाकृतीचें महत्त्वाचें लक्षण असून कागदावर तें उतरणें केवळ गौण आहे. मर्ढेकर आणि वा. ल. कुलकर्णी दोघेहि मनोबाह्य विषय ( object ) होवूं शकणारी आकृतीच कलाकृति मानतात. मर्ढेकर अंतर्मनांत साकार होणें महत्त्वाचें मानतात पण त्याला ते कलाकृति म्हणत नाहींत. वा. ल. कुलकर्णी या साकार होण्याला महत्त्वाचें मानतात; पण बाह्यरूप घेवून मनाबाहेर प्रगट होणें जास्त महत्त्वाचें मानतात. अंतःप्रेरणेनें होणाऱ्या दर्शनावर क्रोचे कलाकृतीचें मोल ठरवितो. जीवनरहस्याच्या जवळ जाण्यांत आलेल्या यशावर मर्ढेकर वाङ्मयीन महात्मता ठरवितात आणि







वा. ल. कुलकर्णींजवळ वाङ्मयीन महात्मतेचा निकष नाहीं. म्हणजे वा. ल. कुलकर्णी आणि मर्ढेकर क्रोचेच्या विरोधी असून शिवाय त्या दोघांतहि महत्त्वाचे फरक आहेत. ' स्थूल मानानें ' हे शब्द इतके फसवे आहेत.

" समजा, भारताच्या एका साहित्यिकाला जर पाकिस्तान द्विखंड असल्यामुळें त्याची होणारी गैरसोय टाळण्यासाठीं त्यांना जोडणारा लांबच लांब असा पट्टा उत्तर भारतांतून तोडून द्यावा असा विचार उत्कटतेनें जाणवला आणि जर हा अनुभव साकार झाला तर निष्ठा अगर संवाद यांचा हवाला देऊन कलाकृतीचें समर्थन करणें योग्य होईल काय ? ज्या भारतीयाच्या मनांत हा विचार येईल त्याच्या व्यक्तित्वाचें राष्ट्रद्रोही स्वरूप यामुळें उघड होणार नाहीं काय ? " असा प्रा. अ. ना. देशपांडे यांचा सवाल आहे. एका प्राध्यापकानें असा मुद्दा मांडावा याचें नवल वाटतें. हा मुद्दा मांडून वा. ल. कुलकर्णी यांचा उपहास करता येईल पण खंडन करतां येणार नाहीं. वरील प्रकारचा विचार भारतीय कलावंताच्या मनांत आला तर तो राष्ट्रद्रोही, पाक कलावंताच्या मनांत आला तर तो देशभक्त ! रशियन कलावंत, मानवतावादी कलावंत आणि साम्राज्यवादी कलावंत असेंच कीं नाहीं ? आवेशपूर्ण प्रतिपादनाच्या भरांत, आपण तिहेरी चूक करीत आहोंत याचें त्यांना भान नाहीं. ( १ ) जेथ-पर्यंत वा. ल. कुलकर्णी यांचा संबंध आहे ते या आकृतीला कलाकृति म्हणणार नाहींत. या कलाकृतीच्या द्वारें पूर्ण होणारें कुतूहल दुष्ट आहे हा त्यांचा मुद्दा राहील. ( २ ) ज्या बेडेकरांची त्यांनीं स्तुति केली आहे ते म्हणतील अशा कलाकृतींत भारत, पाक, पट्टा, अडचणी इत्यादि अर्थरूपें होतात म्हणून या कलाकृतीचें स्वरूप असें होतें : " एकाद्या राष्ट्राच्या प्रामाणिक अडचणीसाठीं दुसऱ्या राष्ट्रानें कुठपर्यंत कमाल त्याग करावा या बाबत एकाद्याचें उत्कट प्रामाणिक मत म्हणून येथें राष्ट्रद्रोह याशब्दाला कांहीं अर्थ नाहीं." ( ३ ) मी या प्रश्नाचें उत्तर असें देईन कीं अ. ना. देशपांडे यांना ललित साहित्यांतील उत्कटतेचें स्वरूप नीट समजलें नाहीं. ललित साहित्यां-तील उत्कटता संवेदनांच्या उत्कटतेपेक्षां तर निराळी असतेच; पण विचाराच्या उत्कटतेपेक्षां आणि साध्या उत्कटतेपेक्षांहि निराळी असते. ललित साहित्यांतील उत्कटता ही विषयामुळें मनांत उठणाऱ्या काहूरांची कलात्मक पातळीवरील उत्कटता असतें. यामुळें कला-कृतींत जी विषयदर्शनानें निर्माण झालेली उत्कटता असते ती गौण. या प्राथमिक उत्कटतेमुळें निर्माण होणाऱ्या काहूराची उत्कटता साधारण महत्त्वाची. आणि हें काहूर कलात्मक पातळीवर गेल्यावर त्यांत असणारी उत्कटता खरी महत्त्वाची. थोडक्यांत म्हणजे अ. ना. देशपांडे ज्याला उत्कटता म्हणतात तो काव्यविषयच होवूं शकत नाहीं.

काव्यविषय म्हणजे काय, याबाबत देशपांड्यां-च्या मनांत गोंधळ असल्यामुळें मेरी फिल्टन व शेक्सपियर या प्रश्नाबाबत एक चूक झाली आहे. शेक्सपियरच्या व्यक्तित्वाला भारून टाकणारी ही कृष्ण-सुंदरी फ्रँक हॅरिस यांना त्याच्या चरित्रांत महत्त्वाची वाटते. चरित्र लिहितांना हॅरिसनें केलेल्या अर्थवादा-त्मक स्तुतीच्या मागें लागण्यांत अ. ना. देशपांडे यांची गफलत झाली आहे. मेरी फिल्टनवर फिदा झाल्यामुळें शेक्सपियरच्या मनांत जीं काहूरें उठत त्यांची व्याप्ति अखिल मानवजातीच्या प्रेमभावने-इतकी होती आणि त्यांची खोली समग्र जीवनाचा गाभा कवळणारी होती, यांत शेक्सपियरच्या काव्याचें मोल आहे. शेक्सपियर मेरी फिल्टनवर फिदा होण्या-ऐवजीं हेंच वेड त्याला ॲना हॅथवेबद्दल असतें तरी कांहीं बिघडलें नसतें. तें वेड मोलाचें आहे, मेरी फिल्टन नव्हे.

कुसुमावतीबाई आणि बेडेकर यांना उचलून धरून आणि मर्ढेकर व वा. ल. कुलकर्णी यांना कमी लेखून स्वतः अ. ना. देशपांडे यांनीं जे निकष शोधले आहेत ते पाहिले म्हणजे मर्ढेकर त्यांना समजले नाहींत आणि बेडेकर पचले नाहींत याची खात्री होते. त्यांनीं दिलेले तीन निकष असे आहेत : ( १ ) विशिष्ट वाङ्मयीन कृतींतून प्रगट होणारें निर्मात्याचें जें व्यक्तित्व त्याची इयत्ता कोणती ? ( २ ) त्या कलाकृतीं-तून प्रगट झालेल्या आशयावर त्याची निष्ठा कितपत जवळ व उत्कट आहे ? ( ३ ) तो आशय ज्या चित्रा-कृतीच्या साह्यानें प्रगट झाला आहे तींत अंतर्गत सुसंवाद कितपत आहे ? – कोणत्याहि व्यक्तीचें व्यक्तित्व म्हणजे त्याचे नुसते प्रत्यय नसून ग्रह, आग्रह, गंड,






सामान्य ज्ञानाचा सांठा, निर्णयशक्ति, ग्रहणशक्ति या साऱ्यांची गोळाबेरीज असते. व्यक्तित्वाचा दर्जा या शब्दाचा अर्थ अ. ना. देशपांडे समजतात तसा नसून कांहीं वेगळीच भानगड आहे. त्यासाठीं युंग, ॲडलर, वुंड्ट इत्यादींना शरण जावें लागेल. हा निकष 'कलाकृतीच्या परिशीलनानें सहृदयास जो उत्कट अनुभव प्राप्त होतो तो कितपत मोलाचा आणि व्यापक आहे असा असायला हवा" डॉ. रिचर्ड्स यांनीं याबाबत जें सैद्धांतिक मार्गदर्शन केलें आहे तें मोलाचें ठरावें. कलाकृतींत जी निष्ठा आणि उत्कटता हवी असते तिचें स्वरूप आशयावरील निष्ठेचें नसतें. वर निष्ठा आणि उत्कटता यांचें स्पष्टीकरण येऊन गेलेलें आहे. "कलाकृतीच्या परिशीलनानें जो मोलाचा अनुभव प्रगट होतो तो कितपत उत्कट आहे" हा निकष असा असावयाला पाहिजे. (प्रा. अ. ना. देशपांडे यांच्या मार्गानें जातांना पहिल्या निकषावर डॉ. केतकर व दुसऱ्यावर पू. सानेगुरुजी सर्व श्रेष्ठ कादंबरीकार ठरतात). उत्कट अनुभव जेव्हां कलात्मक पातळीवर जातो तेव्हां त्यांत एक प्रकारची संपूर्णता व एकजीवपणा येतो. मर्ढेकर आणि वा. ल. कुलकर्णी यालाच सौंदर्यनिष्ठ सुसंगति म्हणतात. प्रा. अ. ना. देशपांडे यांना हाच अर्थ अभिप्रेत असेल कीं काय याची शंका आहे. कलाकृतीच्या परिशीलनानें जो उत्कट व मोलाचा अनुभव येतो तो कितपत एकजीव आहे, असेंच या निकषाचें स्वरूप हवें.

कलाकृति ही एक जिवंत संघटना असते आणि म्हणून तिचे निकष वेगळेवेगळे असे मानले तरी ते अपरिहार्यपणें एकजीव झालेले असावेत. सारे निकष एकाच साहित्यशास्त्रीय भूमिकेंतून निर्माण होत असल्यामुळें ते सारे एकमेकांतून उपपन्न व्हावेत. प्रा. अ. ना. देशपांडे यांचे निकष वेगवेगळे पाहिले असतां चुकीचे आणि एकत्र पाहिले असतां वर दिलेल्या कसोट्यांवर न उतरणारे असे आहेत.

---

## आज सर्वत्र उल्हास !

आज पाहिला उल्हास
पानापानांच्या रोमांत
कणाकणांत हवेच्या
ओल्या मातीच्या मनांत.

आज हांसले अवघे
तृण, पाणी, रोपें, वारे
धुंद नाचले ओघळ
दूर सरले किनारे

आज आनंदीआनंद
उरे व्यापून आकाश
आले भरून भूमीचे
खोल तडे सावकाश

आज पावसाला माफी
आज माफी वादळाला
आज वेदनांवरती
तृप्त मोद अंकुरला !

आला भादवा भेदून
आर्द्र श्रावणाची कूस
उंच वृक्षांच्या वक्षांत
कोंब पावले विकास.

आज सर्वत्र उल्हास !

लसलसली पालवी
रम्य पोपटी ऐटींत
फांदीफांदीशीं जाहले
फुलाफळांचे संकेत

दगडांतहि शिरले
नवे कंप, नवे प्राण
डहाळींतून स्फुरले
नवे स्वर, नवें गान.

आज आल्हाद मावेना
स्वैर वाऱ्याच्या मनांत
त्याला सांगायाची घाई
सारें तृणाच्या कानांत.

हळूं मोहरून आला
गोड शांततेचा कोष
एकांताच्या गालावर
फिटे संतोषाचें पीस !

किती राहील लपून
रानफुलांचें मानस ?
भिटलेल्या पाकळ्यांत
उचंबळला सुवास.

आता फुलेल उल्हास

दिशादिशांत हांसऱ्या
दुमदुमला उल्हास
कळ्यांकळ्यांत लाजऱ्या
दरवळतो उल्हास.

भव्य फेंसाळ ढगही
शुभ्र पांढऱ्या गुंगींत
नभीं रेलून केशरी
सूर्यकमळ डुंगीत !

क्षितिजानें मांडियला
रंगारंगाचा विलास
येथें येऊन थांबती
सर्व गंध, सर्व श्वास.

मिटे प्रकाशपापणी
येई काळोखाचा थर
देत आतुर जगाला
लक्ष नक्षत्रांचा वर !

आलें अंधाराच्या घरीं
आमंत्रण प्रकाशास
मध्यरात्रीसहि झाला
नव्या पहाटेचा भास !
आज जगलों उल्हास ! !

—राम शेवाळकर








प्रा. व. म. परांजपे

# अमेरिकेचा श्रेष्ठ नाटककार युजीन ओनिल (१)

## सुरुवातीची अमेरिकन रंगभूमि

मराठी रंगभूमीप्रमाणेंच अमेरिकन रंगभूमीची सुरुवातहि अलीकडल्या काळांत झाली आहे. १७६७ मध्यें अमेरिकेंत पहिलें नाटक लिहिलें गेलें व त्यानंतर मधूनमधून थोडासा प्रयत्न झालेला दिसतो. परंतु एकूण १८९० पूर्वीचें या रंगभूमीचें स्वरूप अगदींच ओबडधोबड होतें. नाटकांच्या नांवांवर, ग्राम्य विनोद आणि गांवढळ संवाद यांचाच धुडगूस अधिक असे. इ. स. १८९० ते १९१४ या दरम्यानच्या काळांत या परिस्थितींत कांहींशी सुधारणा झाली. परंतु अजूनहि नाट्यक्षेत्रांत, खुद्द नाटककारापेक्षां, नट आणि मॅनेजर यांचाच जास्ती बडेजाव असे. भव्य स्टेज, भपकेदार कपडे, चित्तथरारक कथानक, ढंगदार पात्रें, – या झगमगाटाचेंच प्रेक्षकांना कौतुक होतें. अजून नाटकाला असें स्वतंत्र महत्त्वाचें स्थान नव्हतेंच. कोणतेंहि नाटक चाले. बहुतेक वेळीं युरोपमधील एखाद्या नाटकाची उसनवारी करून, वेळ मारून नेली जाई. उदाहरणादाखल सांगावयाचें झालें तर, १८६५ मध्यें लिंकनचा ज्या नाट्यप्रयोगाच्या वेळीं खून झाला, तें 'Our American Cousin' हें नाटकहि कोणा अमेरिकन नाटककाराचें नसून, टेलर नांवाच्या एका इंग्लिश लेखकाचें होतें. याच वेळीं युरोपमध्यें नाट्यकलेनें उत्कर्षाचा उच्च बिंदु गांठला होता हें ध्यानांत घेतलें, म्हणजे त्या पार्श्वभूमीवर हा विरोध फारच उठून दिसतो. इब्सेनचें 'Ghosts' (१८८१), स्ट्रिंडबर्गचें 'Miss Julie' (१८८८) आणि शॉचें 'Widower's Houses' (१८९२)–या नवोदित नाटकांनीं त्या वेळीं युरोपिअन रंगभूमीवर मोठी खळबळ उडवून दिली होती. अमेरिकन नाट्यसृष्टींत मात्र अजून सामसूमच होतें. पिनेरोइतपत दुय्यम प्रतीचा नाटककारहि अजून निर्माण झाला नव्हता. मग वरच्यासारख्या अव्वल दर्जाच्या नाटककारांची गोष्टच नको ! परंतु ही उणीव केवळ नाट्यापुरतीच मर्यादित होती, असें मात्र नव्हे. जराशा मोठ्या प्रमाणावर, हेंच वैगुण्य सर्वसाधारणपणें एकूण अमेरिकन वाङ्मयांत व संस्कृतींतच प्रतीत झालेलें दिसून येतें. जॉन मॅसी या टीकाकारानें अमेरिकन वाङ्मयांतील जिवंतपणाच्या या अभावाबद्दलची केलेली मीमांसा मोठी मार्मिक वाटते. तो म्हणतो : "आमचे लेखक जीवनाकडे पाठ फिरवून बसले आहेत. त्यांतील आवेगांना ते पारखे झाले आहेत. त्याच्या खऱ्या अर्थाची जाणीवच त्यांना झालेली नाहीं. त्यांचा तो नखरेलपणा आणि भपकेदार देखाव्यांचें त्यांचें वेड यांमुळें, अमेरिकन जीवनांत किंवा इतरत्र मानवी आयुष्यांत चालणाऱ्या प्रचंड संघर्षाची, खळबळीची, त्यांना सुतराम् कल्पना दिसत नाहीं. प्रत्यहीं जीवनाशीं अधिक निकटचें, संपन्न असें संवादित्व साधणाऱ्या युरोपिअन वाङ्मयाच्या तुलनेनें, अमेरिकन वाङ्मय अगदींच फिकें वाटतें !"

विसाव्या शतकाच्या प्रारंभीं साहित्यक्षितिज उजळूं लागलेलें दिसतें. परंतु नाट्यसृष्टि मात्र अजून गडद अंधारांतच राहिली होती व त्यांतून तिची सुटका होण्याचें चिन्हहि फारसें दिसत नव्हतें. नवीन नवीन नाट्यप्रयोगांना उत्तेजन देऊं शकतील अशा नाटक-

श्रेष्ठ अमेरिकन नाटककार यूजीन ओनिल हे डिसेंबर १९५३ मध्यें आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी बोस्टन येथें निधन पावले. त्यांनीं ४७ नाटकें लिहिलीं. १९३६ सालीं त्यांना नोबल पारितोषिक मिळालें. — प्रा. व. म. परांजपे यांनीं आपल्या या अभ्यासपूर्ण लेखांत यूजीन ओनीलच्या कांहीं महत्त्वाच्या नाटकांचा परिचय करून दिला असून, त्या अनुषंगानें या थोर प्रतिभाशाली नाटककाराच्या नाट्यकृतींतील, जीवनदृष्टींतील व कलातंत्रांतील कांहीं प्रमुख वैशिष्ट्यांचें दिग्दर्शन केलें आहे. – प्रस्तुत लेख प्रा. व. म. परांजपे यांच्या विस्तृत लेखाचा पूर्व भाग आहे. राहिलेला उत्तर भाग 'नवभारत'च्या पुढच्या अंकांत प्रसिद्ध होईल — का. सं.








कंपन्या व जेथें प्रयोग करणें शक्य होईल अशीं नाटकगृहें यांचा अभाव हें या मागासलेपणाचें खरें कारण होतें. शिकॅगोमध्यें १९०६ त सुरू झालेलें ' The New Theatre' कांहीं अंशीं ही परिस्थिति बदलूं शकेल अशी आशा वाटत होती. परंतु ती निष्फळच ठरली. रंगभूमीच्या उद्धारास खरा हातभार लावला तो प्रो. जी. पी. बेकर, कवि व नाटककार असलेला डब्ल्यू. व्ही. मुडी, जोसेफाइन पीबॉडी, पर्सी मकाये (Percy Mackaye) इत्यादींनीं व त्यांच्या प्रयत्नामुळेंच अमेरिकन नाट्याच्या प्रगतीस चालना मिळाली. त्यांच्याच जोडीला, जॉर्ज ग्रॅहॅम कुक ऊर्फ ' जिग ' या नांवाची एक व्यक्ति पुढें आली. अनेक तरुण नाटककारांना हाताशीं घेऊन रंगभूमीचा त्यानें कायापालटच घडवून आणला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. ' दि टूरिंग आयरिश प्लेअर्स ', ' वाशिंग्टन स्क्वेअर प्लेअर्स ', ' ब्रॉड्वे थिएटर ' या त्यावेळीं प्रसिद्ध असलेल्या नाटककंपन्यांच्या खेळांमुळें, व त्यांत आढळून आलेल्या नाटकाच्या नवीन पेहेरावानें जॉर्ज ग्रॅहॅम कुक अगदीं भारून गेला. " रंगभूमि ही जगांतील अद्‌भुत सौंदर्यानें नटलेली एक रम्य चीज आहे " अशी एक नवी जाणीव त्याला झाली. कादंबरीकार, पत्रकार, शिक्षक, चित्रकार, शिल्पकार, — असें ग्रॅहॅमचें बहुरंगी मित्रमंडळ या दिव्य आनंदांत त्याच्याप्रमाणेंच धुंद होऊन गेलें. सहानुभवामुळें एकत्रित आलेल्या, परंतु अर्थाअर्थी तसें कांहींच साम्य नसलेल्या या छंदी मित्रमंडळाचें वास्तव्य त्या वेळीं उन्हाळयाच्या निमित्तानें, मॅसॅच्युसेट्समधील प्रॉविन्सटाऊन येथें होतें. तेथेंच त्यांनी ' प्रॉविन्सटाऊन प्लेअर्स ' या नांवानें एक नाटकमंडळी स्थापिली. स्टेजचा पत्ता नव्हता. पण नाटक तयार होतें. तेव्हां पहिल्या खेळासाठीं एका बंगल्याचें पोर्च हेंच स्टेज बनविलें. दुसरा प्रयोग झाला, तो एका फिशहाऊसमध्यें !

## ओनिलचें जिवंतपणानें रसरसलेलें जीवन

पुढील वर्षी युजीन ओनिलची या कंपनींत भर पडली. पंचवीशीच्या आसपास असलेल्या या तरुण नाटककारानें या अगोदर तीन नाटकें लिहिलीं होतीं. हीं नाटकें त्यानें लिहिलीं, तीं एका रुग्णालयांत ! कारण यावेळीं लेखक क्षयानें अंथरुणास खिळून होता.

ओनिलचें या आधींचें आयुष्यहि असेंच बेफाट, परंतु जिवंतपणानें रसरसलेलें आहे. इ. स. १८८८ मध्यें त्याचा जन्म. बाप कसलेला नट असल्यानें, बालपणींच रंगभूमीची जानपछान झाली. या उत्साही बाळानें लहानपणींच आपले प्रताप गाजविण्यास सुरुवात केली. एक दिवस काय डोक्यांत चक्र फिरलें कोण जाणे ? जातां जातां, सहज मजा म्हणून हातांतली बिअरची बाटली प्रेसिडेन्ट विलसनच्या बंगल्यांत दिली तडकावून ! या मर्दुमकीचें लौकरच बक्षीस मिळालें. शिक्षणाला रामराम ठोकावा लागला. १९०९ मध्यें विवाह केला. पण लगेच त्याचें परिमार्जन १९१२ त घटस्फोट घेऊन करून टाकलें. शिक्षणाचा संबंध तुटल्यानंतरच्या पांच वर्षांत ओनिलला आलेला जगाचा अनुभव जितका वैचित्र्यपूर्ण होता, तितकाच तो कडवट होता. औदासीन्य, निराशा, उद्वेग यांनीं हीं पांच वर्षे झांकाळून गेलेलीं दिसतात. कांहीं दिवस, एका ऑफिसांत सेक्रेटरीच्या कामाचा कंटाळवाणा अनुभव त्यानें घेतला. यानंतर, हॉंड्युरासला, सोनें मिळेल या वेड्या आशेनें एक सफर काढली. सहा महिन्यांनीं परतावें लागलें, तें बरोबर सोनें तर नाहींच, पण मलेरिआचें धन घेऊन ! पुढें तीन महिने वडिलांच्या कंपनींत काढले, पण त्याचाहि लवकरच कंटाळा आला, आणि एक दिवस जों उठला तों ब्युएनॉस् एयुरस्ला जाण्यास निघालेल्या एका बोटींत जाऊन बसला. नोकरीसाठीं असा त्यानंतर तो एका ठिकाणीं कधींच टिकून राहिला नाहीं. केव्हां कंटाळा येऊन स्वतःच नोकरीला रामराम ठोकावा, तर कधीं नोकरीवरून कमी केलें जावें. शेवटीं या जगांत खरेखुरे स्नेही कोणी उरले असले, तर ते म्हणजे बोटीवरील माल उतरवणारे मजूर, नाहींतर कांहीं आगापिछा नसलेले नाबाडी आणि अनिर्बंध जिप्सी जीवन जगणारे कांहीं बेफिकीर जीव ! भरपूर, मनसोक्त मद्यप्राशन करावें, आणि मिळेल तेव्हां, आणि मिळेल तसली नोकरी करून राहण्याजेवण्याचा खर्च भागवावा. दारू आणि तमाशे — हीं दोनच सुखाचीं साधनें. जेथें हे तमाशे होत, तें 'सेलर्स ऑपेरा ' म्हणजे ओनिलच्याच शब्दांत एक निव्वळ ' पागलखाना ' होता. सर्वांनुमतें सौंदर्यसम्राज्ञी ठरलेल्या कांहीं बायांजवळ आपल्या कपोलकल्पित साहसांचें वर्णन करावें ! ना ताल ना गोडवा अशीं कुठलींतरी गाणीं रेंकत म्हणावींत, कल्पनाशक्तीवर स्वार होऊन

मनास येतील त्या बेफाम खोट्यानाट्या बढाया ऐकवाव्यात आणि ऐकाव्या, ब्रिटिश आणि अमेरिकन आरमारांत जास्त बलाढ्य बोटी कोणाजवळ आहेत, याबद्दल खूप तावातावानें वादावादी करावी, आणि सरतेशेवटीं, लज्जतीसाठीं उगीच थोडीशी गुद्दागुद्दी!— हा दिवसाचा जीवनक्रम! यांतून जें दिसलें आणि ऐकावयास मिळालें, तें सर्व ओनिलनें टिपून घेतलें. सच्चे, दिलदार, तसे दुष्ट नव्हेत पण विकृत स्वभावाचे, बेफाम, साहसी, कुठें ताळमेळ नसलेले, आडदांड जीवन जगणारे रांगडे खलाशी— त्यांच्याबद्दल ओनिलच्या नाटकांतून प्रतीत होणारा त्याचा जिव्हाळा येथील अनुभवांतूनच निर्माण झालेला आहे. नाविक-जीवनावरील त्याच्या नाटकांवर याच प्रसंगांचा गडद रंग आहे.

यानंतरच्या काळांत, ओनिलनें चार-सहा महिने गुरांची वाहतुक करणाऱ्या एका नॉर्वेजिअन जहाजावर खेचरांची निगा राखण्याचें काम केलें. या भ्रमंतींत थोडा खंड पडला, तो न्यूयॉर्कमधील ' जिमी द प्रिस्ट्स्' या ठिकाणीं रहावयाला आला तेव्हां. हें ठिकाण तर शुद्ध नरकच होता; त्याला कंटाळून ओनिलच्याच खोलींत राहणाऱ्या एका गृहस्थानें बघतां बघतां एके दिवशीं खिडकींतून उडी टाकून आत्महत्या केली. असले प्रकार तेथें नित्याचे होते. पण याच वास्तव्यांत एक दिवस अचानक लग्गा लागला. जुगारांत दांडगी रक्कम मिळाली — अगदीं तर्र होण्याइतपत! आतां ' कोरडे ' राहण्याचें काय कारण ? — दोन दिवसांनीं जगाची शुद्धबुद्ध आली, तेव्हां खिशांत न्यू ऑर्लिअन्सचें तिकिट आहे, आणि आपण गार्डीत आहोंत, येवढें ध्यानांत आलें. — ऑर्लिअन्सलाच जाण्याचें कारण ? तें एक परमेश्वरालाच माहित!

' प्रॉविन्सटाऊन ' नाटकमंडळींतील ओनिलच्या आगमनापासून, अमेरिकन रंगभूमीच्या इतिहासांत एक नवें पर्व सुरू होतें. ' Bound East for Cardiff ' या नाटकाच्या प्रयोगाच्या वेळीं प्रेक्षकांनीं टाळ्यांचा येवढा प्रचंड कडकडाट केला कीं शेवटच्या प्रवेशांत दाखविलेला बोटींचा धक्का अक्षरशः हादरला. ओनिलच्या या यशामुळें नाटककार आणि नट यांच्यांत सहकार्याची भावना निर्माण झाली. प्रतिभेचा स्वच्छंद आविष्कार करण्याचें स्वातंत्र्य नाटककाराला मिळालें, तसेंच प्रतिभावान् नाटककारामुळें नटाच्याहि जिण्यास कांहीं अर्थ प्राप्त झाला. मॅनेजरचेंहि जोखड दूर झालें. ओनिलच्या आश्रयामुळें नाटकमंडळीचेंहि नांव बदलून ' प्लेराईट्स थिएटर ' असें ठेवलें गेलें. हा बदलहि मोठा सूचक आहे. या नव्या जमान्यांत, नाटककाराचें महत्त्व फार वाढलें. ही परिस्थिति बदलण्यांत जॉर्ज ग्रॅहॅम कुकचा वांटा फारच मोठा आहे. नवीन नाटककारांना पुढें आणून त्यांची प्रेक्षकांना ओळख करून देण्याची कामगिरी त्यानें कौशल्यानें पार पाडली. व त्याचमुळें त्याला ' नाटककारांचा प्रेषित ' ही संज्ञा प्राप्त झाली. ' The playwright was the God, and Cook was his Prophet ' असें या परस्परसंबंधाचें वर्णन केलें जातें. १९२५ पर्यंतच्या अवधींत त्यांनीं एकूण ९३ नाटकें बसविलीं नाटककर्त्यांची संख्या जवळजवळ ४७ येवढी होती. आणि ते बहुतेकजण अमेरिकन होते. Edna Ferber, Edna St. Vincent Millay यांसारख्या प्रथितयशांचाहि यांत अंतर्भाव होतो. याशिवाय, Washington Square Players, Neighbourhood Playhouse इत्यादि कंपन्यांनींहि ओनिलचीं कांहीं नाटकें रंगभूमीवर आणलीं.

आतां अमेरिकन रंगभूमि खऱ्या अर्थानें अमेरिकन बनली. आणि येथूनच पुढें जागतिक प्रसिद्धि मिळविलेले नाटककार निर्माण झाले.

## नाटकांतील भेसूर मालमसाला

ओनिलच्या आयुष्याची एकूण खडतर कथा वाचली, म्हणजे येवढ्या मोठ्या नाटककाराच्या वांट्याला आलेल्या या कठीण परिस्थतीबद्दल हळहळ वाटते व त्याचबरोबर, त्यांतूनहि नव्या जोमानें फुललेल्या त्याच्या प्रतिभेचें कौतुकहि वाटतें. या परिस्थितीमुळें एक मात्र घडलें. आणि तें म्हणजे, पहिल्यापासूनच, आपण अनुभवलेल्या हाणामारी, रक्तपात, या संसाराच्या रौद्र स्वरूपाबद्दल त्याला एक विशेष आकर्षण निर्माण झालें. त्याच्या एकूण नाटकांत मिळून एकदोन नव्हे चांगले ३६ भयानक मृत्यू, ८ आत्महत्या, २३ खून, ७ वेडीपिशीं माणसें, एवढा भेसूर मालमसाला आढळून येतो. त्याच्या लिखाणाला लागलेलें हें विशिष्ट वळण बऱ्याच प्रेक्षकांना खटकतें. परंतु



अनुक्रमणिका






कृत्रिम भपकेदारपणानें मोहून जाणाऱ्या अमेरिकन प्रेक्षकांना, जीवनाच्या सत्यस्वरूपाची ओळख करून देण्याचा हा एक धाडसी प्रयत्न होता हें यासंबत लक्षांत ठेवलें पाहिजे. ओनिलनें स्वतः अनुभवलेल्या जीवनांत, हाणामारी, खून, आत्महत्या इत्यादि भीषण प्रसंगांची तशी वाण नव्हती. गूढगंभीर, चंचल महासागरावर त्यानें आयुष्याचीं बरींच वर्षे घालविलीं होतीं. जोडीला, त्या सागराचीं लेकरें असणारे महा-अस्थिर स्वभावाचे नावाडी कधीं अगदी बेदरकारपणें निर्बंध जीवन घालवितील, तर केव्हां स्वतःशींच अकारण रडव्या सुरांत कुरकूर चालू ठेवतील. बेफाट, बेपर्वा आणि सतत भावनावेगांवर हिंदकळणाऱ्या या नावाडयांच्या जीवनांतून, भीषण, झंझावाती अनुभव साकार होत असतात! अवास्तव भासणाऱ्या, या 'पंजाबी' हाणामाऱ्यांच्या देखाव्यांनीं आणि कर्कश रडण्याओरडण्यानें, नाटकाची हानि किती होते, याची कल्पना ओनिललाहि पुरेपूर होती. आणि त्याबद्दल वाटणारा तिरस्कारहि त्यानें योग्य शब्दांत व्यक्त केला आहे. "कादंबरीतल्या किंवा नाटकांतल्याप्रमाणें, आतां सगळें संपलें, सगळयाचा नीट शेवट झाला, असें आयुष्यांत कधींच घडत नाहीं. एका अनुभवांतून दुसरा अनुभव आकार घेत असतो. जीवनांत तर नाहींच, पण पहिल्या प्रतीच्या कथावाङ्मयांतहि, आत्महत्या, खून इत्यादि प्रकारच्या मृत्यूच्या भीषण तांडवानें कोणतीच निरगांठ सुटूं शकत नाहीं. हे प्रसंग म्हणजे बहुधा, अशा नाटककारानें नाटकांत पादपूरणार्थ योजलेल्या दिखाऊ, बनावट कल्पना असतात. यापलीकडे त्यांना महत्त्व नाहीं. लेसिंग नेहमीं एक गोष्ट सांगे, ती तुम्ही ऐकली आहे काय?— एका नाट्यप्रयोगाच्या वेळीं, एका प्रेक्षकानें आपल्या शेजारीं बसलेल्याला विचारलें : 'या नाटकांतील जें हें पात्र आतां मरून पडलें, तें कशामुळें?' 'पांचव्या अंकामुळें—दुसरें काय?' हें त्याला उत्तर मिळालें. त्यावर लेसिंग पुढें लिहितो, 'खरोखरीच पहिल्या चार अंकांत चांगलीं धडधाकट दिसणारीं अनेक पात्रें, या पांचव्या अंकाच्या असाध्य रोगाला एकदम बळी पडतात!—"

ही जाणीव असूनहि, ओनिलनें आपल्या नाटकांसाठीं निवडलेलें मानवी सृष्टीचें स्वरूपच असें कांहीं विलक्षण आहे कीं नकळत अनैसर्गिक वाटणाऱ्या या भीषण प्रसंगांकडे त्याची लेखणी वळते. 'Beyond the Horizon' हें नाटक पाहिल्यावर ओनिलच्या पित्यानें त्याला विचारलें होतें, "तुझें हें नाटक पाहून सगळया प्रेक्षकांनीं आत्महत्या करावी, असा विचार आहे कीं काय तुझा?"—या प्रश्नावरून एकूण सर्वसाधारण प्रेक्षकांचें ओनिलचीं नाटकें पाहून काय मत होत असेल, याची कल्पना येऊं शकते.

## वासनांच्या भोंवऱ्यांत सांपडलेलीं साधीं माणसें

त्याच्या बहुतेक नाटकांतील पात्रें, एखाद्या वासनेच्या आहारीं जाऊन, तिच्या पूर्तीच्या ध्यासानें पछाडलेलीं आहेत. त्यामागें धांवतां धांवतां, आपलें जीवन मोडून तोडून, ते उध्वस्त करून टाकतात. 'Gold' या नाटकाचा बार्ट्लेट् हा नायक पहा. एका निर्जन बेटावर पुरलेल्या पेटीमध्यें सुवर्णसंपत्ति आहे, या कल्पनेनें तो पुरा वेडा बनला आहे. ती संपत्ति साध्य करून घेण्याच्या प्रयत्नांत, त्याचा स्वयंपाकी, केबिन-बॉय, त्याची पत्नी—इतक्या साऱ्यांचा स्वतःच्या हातानें नव्हे पण अप्रत्यक्ष रीत्या त्यानें बळी घेतला आहे. या पापाची नैतिक जबाबदारी त्याचीच आहे. याशिवाय, या वेडापायीं, पोटच्या पोरांनीं आणि त्यानें स्वतः ज्या यमयातना अनुभविल्या त्या वेगळयाच! 'Beyond the Horizon' मधील रॉबर्ट मेयो हें पात्रहि असेंच उराशीं बाळगलेल्या स्वप्नांनीं तोल सुटलेलें असें आहे. किंबहुना, या नाटकांतील प्रत्येक पात्र, जें गवसणार नाहीं, जें आटोक्याबाहेरील (Beyond the Horizon) आहे, त्याच्या ध्यासानें वेडेपिसें झालेलें दिसतें. 'Desire Under the Elms' या नाटकांतील शेतकरी-कुटुंबांतील प्रत्येक माणूस जमिनीच्या तुकड्यासाठीं हपापलेला, निष्ठुर,—कां तर देवाला तसेंच आवडतें म्हणून समर्थन करणारा, मी, माझा मान, अधिकार याबद्दल कमालीचा जागरूक असणारा, लोभी, सौंदर्यासक्त, कामवासनेच्या पूर्तीसाठीं आसुसलेला असा आहे. या भावना नेहमींच्या साध्या, सरळ नाहींत. त्यांनीं त्यांना पुरतें ग्रासून टाकलें आहे. 'The First Man' मधील कर्टिस जेसन, हा आदिमानवाच्या उत्पत्तीसंबंधींच्या संशोधनामध्यें जगाला विसरला आहे. संशोधनाची धुंदी आणि



अनुक्रमणिका






त्याच्या जोडीला गतायुष्यांत घडलेल्या पोटच्या गोळयांच्या अपघाती मृत्यूनें मनाला बसलेला धक्का यांमुळें कौटुंबिक जीवनाकडे त्यानें पाठ फिरविली आहे.

ओनिलचे हे नायक तसे, कुठल्याच दृष्टीनें, थोर नाहींत, किंवा त्यांच्या झगड्याचें स्वरूपहि लोक-विलक्षण नाहीं. हीं साधीभोळीं माणसें केवळ अनावर झालेल्या आपल्या इच्छा-आकांक्षांच्या भोंवऱ्यांत सांपडून नामोहरम झालीं आहेत. एखाद्या जुनाट रोगानें पछाडल्याप्रमाणें, एकच एक कल्पनेनें वा विचारानें त्यांच्या मनांत कायमचें घर केलें आहे. त्यामुळें ते अंतर्बाह्य पोंखरले गेले आहेत, त्यांच्या दाहानें ते होरपळून निघाले आहेत. एरवीं कुठल्या ना कुठल्या प्रकारचें पाशवी बळ अंगांत असणाऱ्या या राक्षसांना, एका गूढ अंतःशक्तीनें पार जखडून टाकल्यानें, तिच्यापुढें ते हतबल झाले आहेत. इसापनीतींतल्या गोष्टीप्रमाणें, " एका इवल्याश्या भावनेच्या उंदरानें, या जंगली पशूला अगदी गोगलगाय बनवून टाकलें आहे. " इब्सेनच्या 'Wild Duck' मधील डॉ. रेलिंगचे उद्‌गार याठिकाणीं मननीय वाटतात : " Rob the average man of his life-illusion and you rob him of his happiness at one stroke. " आयुष्यांत विसावा देणारें एखाद्याचें स्वप्न त्याच्यापासून हिरावून घेतलें गेलें, तर त्याचक्षणीं त्याचें सारें समाधान नाहींसें होईल. ओनिलच्या नाटकांतील हीं पात्रें अशींच आपल्या स्वप्नांना छातीशीं कवटाळून धरतात, आणि गडकऱ्यांच्या 'राजहंसांतल्या'–प्रमाणें, आपल्यापासून तीं छिनावून घेतलीं जाऊं नयेत म्हणून शेवटपर्यंत कसलीहि पर्वा न करतां प्राणपणानें झगडत राहतात. याचमुळें हे अभागी वेडेपिसे बनलेले जीव आपल्या वेडांतहि प्रेक्षकांच्या मनाला चटका लावल्याशिवाय राहत नाहींत.

### पिशाचयोनीला शोभणारीं पात्रें !

ओनिलच्या नाट्यसंसारांत, या विशिष्ट स्वभावरेखेचाच वाढता आविष्कार आपणांस पहावयास मिळतो. नीती-अनीतीच्या जोखडापासून मुक्त होऊन निर्बंध जगणारा, जवळजवळ पशुकोटींतला, त्याच्या आधींच्या नाटकांचा नायक–हाच पुढें जरासा निराळ्या स्वरूपांत आपणांपुढें येतो. एखाद्या मानसिक व्याधीनें खाऊन टाकल्यानें हतबल झालेला नंतरच्या नाटकांतील नायक पहिल्याचाच भाऊबंद आहे. त्याच्या बाह्य तोंडावळयांत थोडासा बदल आढळला, तरीहि त्याची मूळप्रकृति पूर्वींचीच आहे. केवळ स्वार्थी, निर्घृण, अविचारी वाटणारा हा रानवट माणूस, त्याच्या या प्रथमावतारांत आपल्या मनावर मुळींच छाप पाडूं शकत नाहीं. 'Thirst' या नाटकांत बोटीवरून प्रवास करणारी एक नर्तिका, तहानेनें व्याकूळ झाल्यानें, घोंटभर पाण्यासाठीं एका नीग्रो नावाड्याला, प्रथम आपली मोहनमाळ आणि नंतर नाइलाजास्तव आपलें सौंदर्यहि अर्पण करण्यास तयार होते. कशानेंच त्याचें मन द्रवत नाहीं. पण तिच्या मृत-शरीरावरून नजर फिरवितांना मात्र, त्यावर आतां कसा झकास ताव मारतां येईल, या विचारानें त्याच्या नजरेंत एक वेगळीच अघोरी चमक मारते ! 'Web' या नाटकांतील स्टिव्ह् हाहि रक्तामांसाचा मोठा भोक्ता दिसतो. 'Recklessness' या नाटकांतील नायकास, आपल्या बायकोनें शोफरबरोबर संबंध ठेवल्याची शंका येते. थंडपणें शोफरला तो गाडी घेऊन बाहेर जाण्यास फर्मावितो. आणि हें करीत असतांना, त्याला माहीत आहे, कीं मोटारीचें steering-gear मोडलेलें आहे. सूडाची ही पद्धत अभिनव खरीच !

या व्यक्तिरेखा खूपशा अवास्तव आणि अतिरेकी स्वरूपाच्या भासतात. कलापूर्ण स्वभावदिग्दर्शनाच्या आधारें, त्याची ही हिंस्र वागणूक कमी बदसूर वाटेल, अशीहि योजना नाटककर्त्यानें केलेली नाहीं. नाटक पहातांना समाधान मिळूं शकेल, असे प्रभावी नाट्यगुणहि त्यांत व्यक्त झालेले नाहींत. याच पद्धतीचें 'Before Breakfast' नांवाचें स्ट्रिंडबर्ग-फॅशन एक नाटक ओनिलनें लिहिलें आहे. त्याचें वर्णन तर काय करावें ? साराच और मामला आहे ! सौ. रोलंड या एकीकडे न्याहारी बनवीत आहेत, आणि त्याच वेळीं शेजारच्या खोलींत दाढी करीत असणाऱ्या ॲल्फ्रेडवर त्यांची सरबत्ती चालूं आहे. तिच्याशीं लग्न केलें, ही आल्फ्रेडची घोडचूक तर खरीच, – आणि त्यामुळेंच त्याचे भरपूर बाभाडे निघत आहेत. मधूनमधून, ज्या कोणा पोरीनें नवऱ्यावर भुरळ घातल्याचा संशय आहे, तिचाहि उद्धार

होत आहे. हें स्तुतिगान वाढत वाढत शेवटीं प्रेक्षकास ऐकवेनासें होऊं लागतें. आणि आता कंटाळा आल्यानें, बाईसाहेबहि आपली सरबत्ती थांबवितात. आल्फ्रेडचा यावर काय जबाब येतो, हें ऐकण्यासाठीं प्रेक्षकांची उत्सुकता दुणावते. – बाकी, आल्फ्रेडला आपण अजून कोठें पाहिलें आहे, म्हणा ? फक्त मध्यें एकदां थोडेसें पाणी घेण्याकरितां त्यानें हात पुढें केला होता, तेव्हां त्याच्या नाजूकशा, लांबसडक बोटांचें दर्शन आपल्याला झालें होतें, तेवढेंच. – आतां काय घडणार, अशा संभ्रमांत प्रेक्षक आहे तोंच, टप्, टप् असे थेंब पडल्याचें त्याला ऐकूं येतें. आणि मग ध्यानांत येतें कीं आल्फ्रेडनें गळ्यावर वस्तरा फिरविला आहे !

पिशाचयोनींत शोभणाऱ्या या भयानक माणसांच्या तुलनेनें, नंतरच्या नाटकांतील नावाड्यांच्या स्वभावरेखा बऱ्याचशा सह्य वाटतात. तसा त्यांच्या मूळ स्वभावांत फारसा फरक घडलेला नाहीं. भांडकुदळ, फसवे, पाषाणहृदयी, ओबडधोबड स्वभावाचे, अविचारी – थोडक्यांत पशुवतच भासतात ते ! ओनिलनें मात्र, त्यांच्या अघळपघळ, रांकट स्वभावाचेंच कौतुक केलें आहे. या साऱ्या आदिमानवांतून उठून वेगळा दिसतो, असा एक ' Moon of the Caribees ' या नाटकांतील स्मिटी ! हा मोठा भावनाप्रधान मनुष्य आहे. त्याच्या उद्गारांतून, स्वतःबद्दल वाटणारी अनुकंपा आणि आपल्या जिण्याबद्दलची दुबळी, रडवी कुरकूर वरचेवर व्यक्त होते. ओनिलला मात्र, रांकट, सडेसोट स्वभावाचीं माणसेंच जास्त पसंत आहेत. त्यांच्या तुलनेनें हा रडतराऊपणा एकूण परिस्थितीशीं विसंगत तर आहेच, परंतु त्यांत मन वेधून घेईल असाहि कोठला गुण नाहीं. परंतु असें असूनहि, या प्रकारच्या व्यक्तिरेखेचा परिपोष ओनिलनें उत्कटपणें केला आहे. आणि याचें कारण म्हणजे हीं नाटकें लिहिलीं तेव्हां ओनिलच्या मनाची स्थिति थोडीफार अशीच झाली होती. " रस्ता चुकलेलीं, दुबळीं, मुकीं मेंढरें आहोंत आपण, नाहीं ? आपल्या नशिबाचा हा जीवघेणा खेळ, सतत असाच चालायचा, असें नाहीं वाटत तुला ? ". Donkeyman जवळ काढलेल्या या उद्गारांत, स्वतःबद्दल वाटणारी तीव्र निराशाच ओनिलनें व्यक्त केली आहे.

### मानसिक विकृतींतील गूढाचें आकर्षण

स्मिटीशी परिचय झाल्यानंतर ' Beyond the Horizon' मधील रॉबर्ट मेयो हा अगदींच अनोळखी वाटत नाहीं. या विशिष्ट स्वभावरेखेचें हें विकसित रूप स्वाभाविक भासतें. या नाटकांतील रॉबर्ट व त्याचा भाऊ ॲंड्र्यू यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. कांहींसा काव्यात्म वृत्तीचा, सुसंस्कृत असा रॉबर्ट, तर रगेल, रापलेला, आडदांड, जमिनीवर जीव असलेला असा ॲंड्र्यू. मुळांतच स्वप्नाळू असलेला रॉबर्ट सागराच्या गूढ आकर्षणानें पुरता भारून गेला आहे. क्षितिजाकडे बोट दाखवीत, धुंद आवाजांत तो ॲंड्र्यूला आपल्या या प्रीतीचें रहस्य समजावीत आहे : " तिथलें तें सौंदर्य मला खुणावीत आहे. पुस्तकांतून वर्णन केलेली, मनाला मोहून टाकणारी पूर्वेकडची गूढरम्यता, केवळ अनंत अवकाशांत मिळणाऱ्या स्वातंत्र्याची लागलेली आंस, त्या तिथें, क्षितिजापलीकडे दडलेल्या रहस्याचा मागोवा घेतघेत भटकत राहण्यांतला आनंद, लांबचें वाटणारें गूढ, अज्ञात – याची मला ओढ लागली आहे. "

परंतु घडायचें होतें कांहीं वेगळेंच ! दैवानें दोघांनाहि पुरतें चकविलें. प्रेमप्रकरणाच्या पायीं रॉबर्ट शेतकरी झाला, आणि ॲंड्र्यूच्या नशिबीं खलाशी बनून जमिनीऐवजीं समुद्राची मशागत करणें आलें. ओनिलच्या मतें, माणसांना या जगांत, मूळच्या आवडीपेक्षां कांहीं तिसरेंच करणें भाग पडतें, या विलक्षण विधिसंकेतांतच या दुःखांतिकेचें मूळ आहे. एका टीकाकाराच्या म्हणण्याप्रमाणें, सुरवातीच्या एकंदर रागरंगावरून एका अंतर्मुख ( introverted ) व्यक्तीची शोकांतिका या नाटकांत आपणांस पहावयास मिळेल असें वाटतें. परंतु या दृष्टीनें हें नाटक तितकेसें यशस्वी झालेलें नाहीं.

मानसिक विकृतीबद्दल वाटणारी ही आवड ओनिलच्या नाटकांत पुढेंहि दिसून येते. व त्यामुळें त्याच्या नाटकांत एक प्रकारचा हिणकसपणा निर्माण झाला आहे. मानसशास्त्रीय उपपत्तींच्या जंजालांत सतत गुरफटून राहिल्यानें, उदात्त शोकांतिका रचणें त्याला शेवटपर्यंत जमूं शकलें नाहीं. उदाहरणार्थ, त्याचें 'Ile' हें नाटक घ्या. त्याचा नायक कॅप्टन कीनी हा असाच मनाला एकच ध्यास लागल्यानें बेताल बनला आहे. पुढें त्याचें हें वेड इतक्या थराला जातें कीं इच्छा



अनुक्रमणिका






असूनहि त्यांतून तो बाहेर पडूं शकत नाहीं.

' Diff'rent ' मधील एमा क्रॉस्बीची कथाहि ह्याच धर्तीची पण जरा जास्त अर्थपूर्ण आहे. तिची इच्छा एकच कीं, आपला प्रियकर कॅलेब हा अव्यभिचारी निष्ठेचा मूर्तिमंत पुतळा राहिला पाहिजे. हा तिचा अगदीं हट्टाग्रह आहे. इतरांच्या बाबतींत, ती सहानुभूतीनें विचार करूं शकते. पण कॅलेबला मात्र कल्पांतींहि दयाक्षमा नाहीं. तसा कॅलेबहि तिच्याशीं पुरता एकनिष्ठ आहे. पण बोलूनचालून त्याचें खलाश्याचें जीवन. अशाच एका सफरीवर, एका सुंदरीच्या मोहाला तो बळी पडला. नशीब त्याचें ! —अशा माणसाशीं लग्नाची भाषाहि एमा बोलावयास तयार होणें शक्य नाहीं. यानंतरचीं तीस वर्षें तिनें कुवारपणचें व्रत मोठ्या निष्ठेनें पाळलें. नाटकाच्या शेवटल्या अंकांत मात्र, इतकीं वर्षें दबलेली कामवासना उचल खाते. आणि कॅलेबचा एक कोंवळा, पण जरा चंगीभंगी असलेला पुतण्या, तिचें लक्ष्य बनतो. तिच्यापुढें अगदींच पोर भासणाऱ्या या कॅलेबच्या पुतण्याकडे ती जेव्हां प्रेमयाचना करूं लागते, तेव्हां तिच्या त्या निःसंकोच वृत्तीबद्दल मनांत थोडीशी अनुकंपाच वाटते. मनोविकारांचें हें दर्शन कितीहि यथार्थ वाटलें, तरी शोकांतिका म्हणून या नाटकाचा दर्जा हिणकसच ठरतो. एमाच्या घरचीं इतर माणसें खलाशांच्या स्वैर वर्तनाला पुरीं सरावलीं आहेत. या एकाच मुलीनें नैतिक शुद्धतेबद्दल आपले कांहीं टोकळेबाज आडाखे ठरविले आहेत. ओनिलचें हें नाटक म्हणजे, अशा अवास्तव कल्पनांच्या नादीं लागून आपल्या साऱ्या जीवनाचें खरखरीत वाळवंट करून टाकणाऱ्या एका प्रौढ कुमारिकेची ' केस-हिस्टरी ' आहे. शोकांतिकेचा दर्जा त्याला मिळणें शक्य नाहीं.

' Where the Cross is Made ' या एकांकिकेंतील कॅप्टन बार्ट्लेट् हा ' Gold ' या त्याच विषयावर रचलेल्या नाटकाचाहि नायक आहे. या नाटकांतील नाट्यगुण वाखाणण्यासारखे आहेत व त्यांत घडविलेलें मनःप्रवृत्तींचें दर्शनहि परिणामकारक आहे. एका निर्जन बेटावर पुरलेल्या पेटींत सोनें आहे, या भाबड्या आशेनें, हा नायक वेडा झाला आहे. केवळ सोन्याच्या हांवेमुळें, भ्रामक कल्पनेला सत्य म्हणून कवटाळण्यापर्यंत त्याची मजल जाते. प्रत्यक्ष वस्तुस्थितीची जाणीवहि मधून मधून जागी होत आहेच. वास्तव काय आणि कल्पित काय हें न उमगल्यानें होणारा मनाचा गोंधळ ' Where the Cross is Made ' मध्यें चित्रित केला आहे. 'Gold' मध्यें या संघर्षाचें आणखी विकसित रूप पहावयास मिळतें. एकदां केलेला खोटेपणा टिकवून धरण्याची धडपड, आणि त्याचवेळीं मिळणारी सद्-सद्विवेकबुद्धीची टोंचणी—असा मनाचा नवा झगडा येथें निर्माण केला आहे. बार्टलेटची बायको सारा 'मनाला फसविण्याचें पाप कोठें फेडशील ?' असें छेडीत असल्यानें, ती त्याला डोळ्यासमोरहि नको वाटत आहे. सोन्याचें हें वेड त्याचा मुलगा नॅट याच्यापर्यंत पोंचलें आहे. त्यांच्यांत एकटी नॅटची बहिण स्यू ही या मूलांना त्यांच्या नंदनवनाचें खरें स्वरूप समजावून देण्याचा प्रयत्न करीत आहे. नाटकाच्या शेवटीं, कॅप्टन बार्टलेटला आपली चुकी उमगते. परंतु त्यापासून समाधान मिळणें आतां शक्य नाहीं. या निष्फळ, वेडगळ झगड्यानें तो पुरता थकून गेला आहे. वादळानंतरची ही शांतता मोठी करुणरम्य वाटते.

### ' वांशिक धारणा ' या तत्त्वाचें निदर्शन

यापुढील नाटकांत ओनिलनें एक्स्प्रेशनिझम-(Expressionism)चें प्रतीकवादाचें आधुनिक तंत्र हाताळलें आहे. युंग ( Jung ) या मानसशास्त्रज्ञाच्या ' वांशिकधारणा ' तत्त्वाच्या आधारें, माणसाच्या कृती-मागील मूलभूत प्रेरणांचें दर्शन घडविण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. त्यांतील पहिलें नाटक 'Dreamy Kid' हें जरी फारसें यशस्वी झालेलें नसलें, तरी नंतरच्या नाटकांची कल्पना येण्याच्या दृष्टीनें तें उपयोगी पडेल. या नाटकाचा नायक एक नीग्रो आहे. खुनाच्या आरोपा-वरून पोलिस त्याच्या मागावर आहेत. अशा परिस्थितींत मृत्युशय्येवर पडलेल्या म्हाताऱ्या आजीला भेटण्यास तो येतो. इतर नाटकांप्रमाणेंच येथेंहि परस्पर-विरोधी मूलभूत प्रेरणांच्या वावटळींत सांपडले-ल्या या बलाढ्य, रानवट, बेफाम माणसाचा होणारा विनाश नजरेला पडतो. बालसदृश भावना जाग्या झाल्यानें, त्याची स्वसंरक्षणाची प्रेरणाहि मालवते. एका आदिमानवाच्या अर्धविकसित मनोव्यापारांचें दर्शन आपणांस घडेल, अशी सुरवातीला वाटणारी आशा,








पुढें सफळ होत नाहीं. केवळ एक सनसनाटी नाटक येवढेंच त्याचें महत्त्व उरतें.

आपल्या या अपेक्षा, नंतरच्या ' एंपरर जोन्स- ' मध्यें मात्र बऱ्याच अंशानें पुऱ्या होतात. एक्स्प्रेशनिस्ट तंत्र या नाटकांत कौशल्यानें हाताळलें आहे. ढोलक्याच्या घुमणाऱ्या आवाजाचा योग्य वेळीं उपयोग करून, प्रेक्षकांची संवेदना जागी केली जाते. शब्दातीत असणाऱ्या सूक्ष्म भावना जाणवूं लागतात. हें नाटक, जवळजवळ एक लांब स्वगत भाषण असल्यासारखें भासतें. परंतु त्यांतूनच, एका अज्ञात भीतीनें थरकांप उडालेल्या नीग्रो मनाची आकृति आपणांपुढें स्पष्ट होत जाते.

याशिवाय, ब्रुटस या नीग्रो पात्राकरवीं, आधुनिक गोऱ्या संस्कृतीचें भेदक विडंबन ओनिलनें केलें आहे. गोऱ्या माणसाच्या अंगची हुशारी, त्याची कार्यक्षमता, त्याचा संधिसाधूपणा, स्वार्थाशिवाय इतर सगळ्याबद्दल वाटणारी बेपर्वाई — हे सर्व गुण ब्रुटसनेंहि आत्मसात् केले आहेत. लहान चोर आणि मोठे चोर यांतला त्यानें दाखविलेला फरक मोठा मार्मिक आहे : " भुरट्या चोऱ्या केल्या, तर उगीच तुरुंगाची वाट धरावी लागते. पण मोठ्या प्रमाणावर हा धंदा जमला, तर सम्राटहि बनतां येईल. आणि मेल्यानंतर, कीर्तिमंदिरांतहि स्थान मिळेल. " हें वाचल्यावर, ओनिलचा जावई, चार्ली चॅप्लिन, याच्या एका भाषणाची आठवण होते : " एकाचा जीव घेतलांत, तर तुम्ही खुनी ! तेंच लक्षावधी माणसांचे जीव घ्या, — कीं राष्ट्रपुरुष ! " – आपल्या साथीदारांनीं केलेल्या लांड्यालबाड्यांकडे ब्रुटस सहज दुर्लक्ष करूं शकतो. आपला ' सम्राटा'चा पेशा तो चालवितो, तो मानमरातबासाठीं नव्हे, तर केवळ पैसा मिळतो म्हणून. वेळ पडलीच तर विचाऱ्या येशूचें गांठोडें खुंटीला टांगून ठेवण्याची त्याची तत्परताहि गोऱ्या जडवादाचें तिरस्करणीय दर्शन आपणांस घडविते.

ओनिलच्या इतर नायकांप्रमाणें मात्र, जोन्स हा कोणत्या वेडगळ स्वप्नसृष्टींत गुंगलेला नाहीं. त्याच्या मनांत निर्माण झालेली, थरकांप उडविणारी अज्ञात भीति हीच समंधासारखी त्याच्या मानगुटी बसली आहे. त्याचा मनावरचा ताबा त्यामुळें पार सुटला आहे. रानटी पूर्वजांच्या अनुभवांतून, निर्माण झालेले मनोगंड, आनुवंशिकतेमुळें त्यांच्यांत उतरले आहेत. ते जागे झाल्यानें, निर्माण होणाऱ्या मानसिक विकृतीच्या भोंवऱ्यांत सांपडून तो भ्रमिष्ट बनला आहे. माणसाच्या सहजप्रवृत्ति, भावना व एकूण जीवनांत अनुभवायला मिळणारीं घटितांची अपरिहार्यता, — या सर्व गोष्टी त्यानें विचारपूर्वक ठरविलेल्या योजनांवर, त्या सारासार-विवेकावर, कार्यकारणमीमांसा करण्याच्या त्याच्या शक्तीवर सहज मात करून जातात, हें दाखविण्यासाठीं, ओनिलनें येथें वांशिक धारणा किंवा पूर्वस्मृति ( Racial memory & atavism ) या उपपत्तीचा उपयोग केला आहे. जोन्सच्या भ्रमिष्टपणावरून आपणांस हेंच समजून येते कीं, माणसाचें जीवन हें केवळ त्याच्या स्वतःच्या नव्हे तर, सबंध मानववंशीय गतकालीन अनुभवांचा परिपाक असतें. किप्लिंगनें म्हटल्याप्रमाणें,

> " We are very slightly changed
> From the semi-apes who ranged
> India's prehistoric clay. "

मानवी उत्क्रांतीच्या बाल्यावस्थेच्या आसपास घुटमळणारा जोन्स हा मात्र ओनिलचा अशा तऱ्हेचा पहिलाच नायक नाहीं. त्याचे रांगडे खलाशी हे अजून वानर-सदृशच आहेत; बोटींवरचे दणगट कप्तान हे केव्हां केव्हां पिसाळलेलीं जनावरेंच वाटतात. आणि त्याच्या रानवट आयरिश आणि लुच्चेपणा करणाऱ्या निग्रोंना अजून माणुसकीचा स्पर्श व्हावयाचा आहे.

## सुंदरी आणि गोरिला

या विचारांचें विकसित रूप 'Hairy Ape' या नाटकांत नजरेस येतें. छातीवरील केंसाळ जंगलामुळें 'केसाळ वानर' (Hairy Ape) या टोपण नांवानें ओळखला जाणारा यँक या कथेचा नायक आहे. एका बोटीवर कोळसे उपसण्याचें काम करणाऱ्या या आडदांड मानवी पशूचें भेसूर रूप पाहून, त्या बोटीवर प्रवास करणारी एक श्रीमंताची लेक बेशुद्ध पडते. आपल्या सौंदर्याचा हा अपमान यँकला सहन होत नाहीं. हें असें कां घडतें, आपलें नेमकें स्थान कोठें आहे हें शोधण्याची त्याची धडपड आहे. आपलें जग कोणतें ? — खलाशांचें ? — सुसंस्कृत माणसांचें ? कीं आणखी कोणाचें ? त्या शोधांत बोटीची एंजिनरूम ते न्यूयॉर्कमधील फॅशनेबल फिफ्थ ॲव्हिन्यूपर्यंत केलेल्या

भ्रमन्तींत, कांहींच हातीं न लागल्यानें, शेवटीं ही स्वारी प्राणिसंग्रहालयांत जाते. आणि तेथें या प्रश्नाचें उत्तर मिळतें. जवळचा लागाबांधा कोठें जमण्यासारखा असला तर तेथील गोरिलाबरोबरच! आपले खरे साथी, एंजिनरूममध्यें खपणारे रांगडे खलाशीहि नाहींत, किंवा फिफ्थ ॲव्हिन्यूवरील झकपक पोषाखांतले 'सुसंस्कृत' लोकहि नव्हेत. पिंजऱ्यांतला गोरिला हाच खरा दोस्त! ... परंतु बिचाऱ्या गोरिलाला याचें काय होय? हस्तांदोलनासाठीं पुढें केलेला यँकचा हात पकडून, तो त्याची पार चटणी उडवून टाकतो.... या घटनांचा अर्थ समजावून देतांना ओनिल लिहितो: "माणसानें एकीकडे पशु-अवस्थेंत सहज होऊं शकणारें निसर्गाबरोबरचें सुसंवादित्व तर गमावलें आहे. पण, त्याची जागा भरून काढण्याकरितां, मानवी अवस्थेंत जरूर असणारें निसर्गाशी वैचारिक तादात्म्यहि होऊं शकलेलें नाहीं. 'Hairy Ape' हें या संभ्रमावस्थेंतील मानवाचें प्रतीकात्मक चित्रण आहे." 'A comedy of ancient and modern life in eight scenes,' अशी एक उपरोधपूर्ण पुस्ती ओनिलनें मूळ नांवाला जोडली आहे. डार्विनच्या सिद्धांतांतील, उत्क्रांत मानव, व इमर्सनचा जणूं यंत्रच बनलेला मानव ('machine man metamorphosed into a thing') या दोहोंची ओनिलनें सांगड घातली आहे. यंत्रयुगाच्या प्रभावानें, आधींच पशु असलेला मानव अधिकच पाशवी बनला आहे, असें आधुनिक माणसाचें वर्णन ओनिलनें केलें आहे. या युगांत मनुष्य एक लोखंडी यंत्राचा गुलाम तरी बनतो, किंवा त्या यंत्रांतून पिळून निघालेला पिसपिशीत टाकाऊ माल तरी बनतो. शेवटीं फारतर गांठीला काय येत असेल तर तो फक्त पैसा! त्या लोखंडी शक्तीचा त्याच्यांत मागमूसहि उरत नाहीं! या केविलवाण्या परिस्थितींतून दयार्द्रबुद्धीनें कोणी उद्धरून टाकील, तर तेंहि होणें नाहीं. मानवी भूतकाळांतच ज्याचा उगम सांपडूं शकेल, अशा या विचित्र परिस्थितीच्या भोंवऱ्यांत सांपडलेल्या आधुनिक मानवाची ग्रहदशा केव्हां संपेल असें दिसत नाहीं.

प्रकृतीनें दणकट, उग्र, हिरवट, स्वतःच्या शक्तीबद्दल जबर आत्मविश्वास असणारा यँक हा खलाश्यांचा मुकुटमणि शोभतो. पण, आपण जंगली आहोंत या जाणिवेनें त्याचा विचार जागा होतो, तेव्हांच तो विनाशाची वाट चालूं लागतो. कारण त्याची विचारशक्ति अतिशय कोती आहे. मिल्ड्रेड डग्लस ही लक्षाधीशाची मुलगी त्याला पाहून बेशुद्ध पडते. या अपमानाबद्दल तो मनांत डंख धरतो, तो मिल्ड्रेड या व्यक्तीबद्दल, – धनिक वर्गाबद्दल नव्हे, हें पाहण्यासारखें आहे. त्याचा मित्र लॉंग हा समाजवादी आहे. परंतु त्याचीं सर्व प्रवचनें यँकच्या बाबतींत मात्र केवळ पालथ्या घड्यावरील पाणी ठरतात. विचार-ग्रहण करण्याची त्याची कुवतच नाहीं. धर्मप्रवचनें वा समाजवादावरील व्याख्यानें या कशानेंच त्याचा उद्धार होणें शक्य नाहीं. या गोंधळलेल्या परिस्थितींत त्याच्या मनाला कशानें समाधान मिळूं शकणार? सुधारलेल्या जगाशीं एकजीव होणें त्याला जमत नाहीं. आणि त्यामुळें येणाऱ्या वैफल्यांतून, पुढें जातां येत नाहीं, परत मागें जावें, हा विचार त्याचें मनांत येतो. पिंजऱ्यांतला गोरिला त्याचें एकमेव आशास्थान बनतो. पण सुधारणा-संस्कृतीची न झेंपणारीं आवरणें फेंकून देऊन, खरोखरींच Hairy Ape बनतांना त्याचा नाश होतो. मिल्ड्रेडला तो जितका परका, तितकाच गोरिलालाहि तो परका आहे!

यँक आणि त्याचा निर्माता ओनिल या दोघांप्रमाणेंच, 'Fountain' मधील ज्वान पॉंस द् लिऑं यालाहि असाच एका हरपल्या श्रेयाचा ध्यास लागला आहे. 'चिरयौवनाचा ठेवा' ('Fountain of Youth') शोधून काढण्याच्या प्रयत्नांत तो गुंतला आहे. शेवटीं तो ठेवा कांहीं लाभत नाहीं. परंतु यौवन प्रीतींतूनच फुलतें, हें रहस्य त्याला उमगलें. प्रेमी जीवांना एकमेकांबद्दल वाटणारी चिरंतन ओढ या कल्पनेवर आधारलेल्या 'Welded' या नाटकाशीं प्रस्तुत नाटकाचें बरेंच साम्य आहे. प्रीतीचा गूढार्थ प्रतीत करण्याचा प्रयत्न या दोन्ही नाटकांत दिसून येतो. परंतु या विशिष्ट अनुभवाशीं ओनिल समरस होऊं शकला नाहीं. गूढवादाचें जग त्याला परकें आहे. त्यामुळेंच या प्रकारच्या त्याच्या लेखनांत एक प्रकारचा पोकळपणा दिसून येतो. स्ट्रिंडबर्गच्या तंत्राची नक्कल करण्याचा त्याचा हा प्रयत्न बराचसा फोल ठरतो. एका टीकाकारानें यासंबंधीं लिहितांना, स्ट्रिंडबर्गचें मूळ तंत्र आणि ओनिलनें त्याची वठविले-








ली नक्कल यांतील फरक फारच चांगल्या तऱ्हेनें दाखविला आहे. स्ट्रिंडबर्गच्या कथावस्तूमधील आवेग अंतरंगांतूनच आहे. ओनिल केवळ बाह्य तडाखेबंद घटनांनीं या आवेगाचा आभास निर्माण करण्याचा प्रयत्न करतो. दोघेहि ऐरणीवर घण मारल्याप्रमाणें लिहितात. "परंतु घण मारल्यानंतर उडणाऱ्या ठिणग्यांत स्ट्रिंडबर्गचें सामर्थ्य आहे. ओनिलमध्यें मात्र, फक्त कानठळ्या बसविणारे आवाज तेवढे ऐकूं येतात. त्यांतून ठिणग्यांचें तेज कधीं प्रकट होत नाहीं."

## 'प्रीतीचें रहस्य'

'Welded' मधील मायकेलच्या व्यक्तिमत्वांत, ज्यॉन, स्मिटी, रॉबर्ट मेयो आणि स्वतः ओनिल या सर्वांच्या स्वभावगुणांचें मिश्रण आढळतें. पहिल्या तिघांप्रमाणें मायकेल काव्यात्म प्रकृतीचा, आणि ओनिलप्रमाणें नाटककारहि आहे. ओनिलच्या नायकां-त नेहमीं आढळणारें वस्तादपणा, लहरीपणा, हळवा स्वभाव, आणि त्याच्या जोडीला असणारा जंगलीपणा, इत्यादि सर्व गुण त्याच्याहि स्वभावांत आहेत. त्याची पत्नी एक नटी आहे. आपल्या पतीनें लिहिलेल्या नाटकांत काम केल्यानें तिला प्रसिद्धि मिळाली. व आतां तिच्या अभिनयकौशल्यानें मायकेलच्या नाटकां-चें नांव होत आहे. ती मोठी व्यवहारी बाई आहे. नवऱ्याची प्रतिभा अगर उदात्त तत्त्वांबद्दल त्याला वाटणारें आकर्षण या दोन्हीहि गोष्टी तिच्याजवळ फारच कमी प्रमाणांत आहेत. स्वभावांतील या विरोधामुळें त्यांच्यांत वारंवार खटके उडतात. आणि त्यांत हार खाण्यास कोणीच तयार नसतें. तरीहि एक-मेकांबद्दलची ओढहि तेवढीच तीव्र आहे. त्यामुळें बोलण्याच्या भरांत, प्रीतीचा विषय निघाल्याबरोबर ते दोघेहि गतकालांतील प्रणयी जीवनाच्या स्मृतींत गुंगूं लागतात. अशाच धुंदींत असतांना एकदां, त्यांच्या नाटकांचा स्टेज-प्रोड्यूसर जॉन तेथें हजर होतो. एलिअ‍ॅनॉरचा तो गेले कित्येक दिवस मोठा चहाता आहे. या त्याच्या येण्यामुळें मायकेल मात्र संतापतो. कधीं क्वचित् येणारा हा सुखाचा क्षण ऐन वेळीं अशा तऱ्हेनें नासल्यानें त्याचा राग अनावर होतो. जॉन निघून गेल्यावरहि वातावरण निवळत नाहीं. मनाच्या या स्फोटक आणि संतप्त परिस्थितींत शब्दावरून शब्द वाढत जातो. बायकोला मिळणाऱ्या यशाबद्दल आधींच वाटणाऱ्या असूयेच्या जोडीला, आतां एलिअ‍ॅनॉरच्या निष्ठेबद्दलहि शंका निर्माण होते. ओनिलच्या नेहमींच्या नाटकी पद्धतीनुसार, मायकेल तिच्यावर चालून जातो. आणि त्याचें पर्यवसान म्हणजे 'काय वाटेल तें करून या प्रेमाची राखरांगोळी केल्याशिवाय राहणार नाहीं' अशा निश्चयानें तो बराबाहेर पडतो. चिडून जाऊन एलिअ‍ॅनॉरहि या स्वातंत्र्याचा उपभोग घेण्याचें ठरविते आणि जॉनकडे निघून जाते. हें करीत असतांना मनांत सूडाची भावना तर आहेच, पण थोडेंफार मनाला सुखहि होत आहे... परंतु तिच्या हातून व्यभिचार घडावयाचा नव्हता. जॉनच्या शय्यागृहाची पायरी चढण्याच्या बेतांत असतांना तिच्या मनांत एक वेगळाच विचार चमकून जातो : "मायकेलवर मी करीत असलेल्या प्रीतीचा नाश करणारा मायकेल कोण ? त्याच्यावरील माझें प्रेम हें सर्वस्वी माझें आहे. तें माझें जीवनसर्वस्व आहे. त्याच्यावर तो हक्क सांगूं शकत नाहीं." या विचारानें तिला पुनः धीर येतो, आणि मोहाला बळी न पडतां ती घरीं परतते. घरीं मायकेल तिची वाट पहात बसला आहे. कारण या या स्वारीचीहि तीच गत झाली आहे. प्रीतीवर निखारा ठेवण्याच्या प्रयत्नांत तो वेश्येकडे गेला, पण एलिअ‍ॅनॉर-प्रमाणेंच त्यालाहि व्यभिचार शक्य झाला नाहीं. त्याला भेटलेल्या वेश्येचें वर्णन करतांना तो म्हणतो : "तूं कांहीं निव्वळ वेश्या नाहींस. पुरुष स्त्रीवर करीत असलेल्या अत्याचारांचें तूं मूर्तिमंत प्रतीक आहेस, — स्त्रीजातीवरचा सूड आहेस. प्रेमानें प्रेमाचा केलेला छळवाद आहेस, प्रेमाची राखरांगोळी म्हणजे तूं ! — माझ्याच बाबतींत नव्हे, तर अनादि काला-पासून तूं हेंच करीत आली आहेस !" थोड्याच काळांत वेश्येकरवीं प्रीतीचा चुराडा करण्याच्या आपल्या या प्रयत्नामागील फोलपणा त्याला जाणवतो. आणि तो तिच्याजवळ कबूलीहि देतो, "माझ्या मनोबलामुळें असो कीं मनोदौर्बल्यामुळें असो, – परंतु छे, मला हें जमणार नाहीं. रामराम !" परंतु याच क्षणीं ती 'बाई', जीवनाबद्दलच्या ओढींतूनच माणसाला उन्नति करून घेतां येते, हें त्याच्या मनावर बिंबविते. पत्नीची परतभेट झाल्यावर, काय काय घडलें, याची हकीगत तो तिच्या कानावर










घालतो. हें होत असतांनाच खोटे अहंकार गळून पडतात. अनुभवांच्या भट्टींतून तावून-सुलाखून निघाल्यानंतर, आतां मिळणाऱ्या नव्या, विशुद्ध एकत्र जीवनाचें स्वप्न रंगवितांना, केपनें प्रीतीचें रहस्य हळुवार हातानें उकलून दाखविलें आहे : " केव्हांतरी अवचित, मी मध्यरात्रीं जागा होतों. भोंवतीं गडद अंधार पसरला आहे, – मी लक्षावधि वर्षें असाच एकाकी आहे, असें वाटूं लागतें. जीवन अजून थांबलें नाहीं. या जाणिवेनें देवाचा धांवा करावासा वाटूं लागतो. आणि एकदम अभावितपणें मला तूं हवीशी वाटतेस. तुला मी स्पर्श करतों. तूं आहेस, – माझ्याजवळ आहेस, हा विचारच किती सुखकारक ! तुझ्यामुळें माझ्या जिण्याला पूर्णता येते – कांहीं अर्थ निर्माण होतो. लक्षावधी वर्षांच्या त्या निबिड अंधकारांतून जीवन मला तुझ्याकडेच खेंचून नेतें. आरंभ जर एकत्वांतून आहे, तर शेवटहि एकत्वांतच होणार या जाणिवेनें मनाला धीर येतो. "

## श्रद्धा आणि बुद्धिप्रामाण्य

ग्रेटब्रिटनमधील ' **दि न्यू स्टेट्समन् ॲण्ड नेशन** ' या विख्यात साप्ताहिकानें 'Faith and Reason' या विषयावर नुकतीच एक निबंधस्पर्धा भरविली. या स्पर्धेकरितां भारत, ऑस्ट्रेलिया, कॅनडा, फ्रॉन्स, जर्मनी वगैरे देशांतून सुमारें ७०० निबंध आले होते. पहिलें पारितोषिक २०० पौंडाचें होतें. तें कोणा एकाला न मिळतां पहिल्या दोन निबंधांमध्यें वाटून दिलें गेलें. **ए. जे. वायकेन** ( wicken ) यांच्या निबंधाचा पहिला नंबर लागला. ऑक्सफर्ड विद्यालयाचे ते ' क्लासिकल स्कॉलर ' होते. सध्यां रॉयल एअर फोर्समध्यें ते शिक्षक आहेत. त्यांच्या निबंधाचा अनुवाद '**साधनें**'त ( ११–६–५५ ) प्रसिद्ध झाला आहे. त्यांतून कांहीं भाग पुढें उद्धृत केला आहे :

" धार्मिक श्रद्धेमुळें माणसाचें धैर्य दुणावतें. जीवनांमध्यें रस उत्पन्न होतो; जीवनहेतु मिळतो. धार्मिक श्रद्धेचें हें कार्य चिरस्थायी ठरतें. धार्मिक श्रद्धेचे जे तीन मुख्य उपयोग आहेत त्यांपैकीं हा सर्वांत महत्त्वाचा आहे. नितिमत्ता वाढविणें व विश्वाच्या उत्पत्तिस्थितिविनाशासंबंधीं सुसंबद्ध स्पष्टीकरण करणें हे धार्मिक श्रद्धेचे दुसरे दोन उपयोग आहेत. पण पहिल्याच्या तुलनेनें हे अल्पकाल टिकतात. सामाजिक परिस्थितीमध्यें माणूस जितका पराभूत होत जातो, तसतशी त्याला धार्मिक श्रद्धेची गरज वाटूं लागते. परित्यक्त, एकाकी, पंगू, पीडित व आसन्नमरण माणसें श्रद्धेचा निवारा शोधीतच असतात.

" पुरावा पुरेसा असला तर आपली श्रद्धा डोळस आहे असें सिद्ध होईल. पण अपुऱ्या किंवा विरुद्ध पुराव्यावरहि श्रद्धा स्वीकारली जाते असें आपण पाहतों. अशा ठिकाणीं हेतु महत्त्वाचा ठरतो. ज्यांना धार्मिक श्रद्धेची आवश्यकता नसते, तेच श्रद्धेच्या उपयुक्ततेचें विश्लेषण करूं शकतात.

आधुनिक जगांत माणसांना धार्मिक श्रद्धेची आवश्यकता तीव्रपणें भासमान होत आहे. जीवनांत भयानक असुरक्षितता निर्माण झाली आहे. ' मानवधर्माची ' म्हणजे न्यायपूर्ण, सदय व सत्य संबंधांची माणसाला आवश्यकता वाटूं लागली आहे. म्हणजे श्रद्धेच्या या कार्याची उणीव भासूं लागली आहे. ...

" अशींहि माणसें भेटतात कीं तीं जीवनाच्या एका क्षेत्रांत वैज्ञानिक दृष्टिकोन स्वीकारतात व दुसऱ्या क्षेत्रांत अंधश्रद्धा मान्य करतात. अनेक प्रसिद्ध गणितशास्त्रज्ञ व वैज्ञानिक अपुऱ्या पुराव्यावर 'मेटॅफिझिकल' श्रद्धा स्वीकारतांना आपण पाहातों. अपुऱ्या पुराव्यावर त्यांनीं वैज्ञानिक सत्य स्वीकारलें असतें तर त्यांची छीःथू झाली असती. जीवनामध्यें अशी फारकत करून कांहीं बाबतींत बुद्धिप्रामाण्य व कांहीं बाबतींत धार्मिक श्रद्धा यांची गल्लत हीं विद्वान् माणसें कां करतात ? त्याचें उत्तर, परिस्थिति, पूर्वसंस्कार व शिक्षण एवढेंच देतां येईल.

" मीहि या युगाचाच एक बालक आहे. सतरा वर्षें पुराव्यानें सत्य कसें सिद्ध करावें याचा अभ्यास केल्यामुळें पुराव्याच्या म्हणजे बुद्धिप्रामाण्याच्या मार्गानेंच गेलें पाहिजे असें मला वाटतें. साध्यांचा जेथें प्रश्न उद्भवतो, ज्या ठिकाणीं पुरावा मिळत नाहीं त्या ठिकाणीं मी अज्ञेयवादी बनणें रास्त समजतों. तर्कशुद्धता, बुद्धिप्रामाण्य, हें श्रद्धेपेक्षां निखालसपणें श्रेष्ठ व श्लाघ्य आहे असा दावा मी करूं शकत नाहीं. मनुष्यमात्रांच्या गरजा भिन्न असतात. आंतरिक समाधान जेणेंकरून लाभेल, असाच जीवनमार्ग माणसानें शोधला पाहिजे. "








प्रा. दत्तात्रय सीताराम पंगु

# महानुभावपंथसंस्थापक श्रीचक्रधर

श्रीचक्रधरस्वामी हे पूर्वाश्रमीं भरवस ( भडोच ) येथील प्रधान सामवेदी नागर ब्राह्मण विशालदेव यांचे पुत्र असून, त्यांचें नांव हरिपाळदेव असें होतें. भरवसचा राजा त्रिमल्लदेव यास पुत्रसंतान नसल्यामुळें, अंतसमयीं त्यानें आपलें राज्य विशाळदेव प्रधानाच्या स्वाधीन केलें. आपल्या बापाच्या कारकीर्दींत हरिपाळदेवानें संसारसुखाचा पुष्कळ उपभोग घेतल्यावर, आपल्या आईच्या अनुज्ञेनें तो रामयात्रेच्या निमित्तानें रामटेकास जाण्यासाठीं निघाला, व वाटेंत श्रीऋद्धिपुरीं त्याला श्रीगोविंदप्रभूंचें दर्शन घडून, या दोघां अवतारी पुरुषांची तेथील रांधवणहाटामध्यें प्रथम भेट झाली. श्रीगोविंदप्रभूंनीं हरिपाळदेवास ज्ञानशक्ति देऊन अनुग्रह केला व त्याचें नांव चक्रधर असें ठेवलें. त्यानंतर श्रीचक्रधरांनीं आपल्या वयाच्या ११० व्या वर्षीं प्रतिष्ठान ( मुंगी पैठण ) येथें संन्यासाश्रम स्वीकारून ऋद्धिपूर येथें महानुभावपंथाची स्थापना केली. श्रीचक्रधरांनीं नागदेवाचार्यादि अनेक शिष्य करून पंथप्रसाराचें कार्य पुढें ९ वर्षे केलें, व आपल्या वयाच्या ११९ व्या वर्षीं म्हणजे शके ११९३–९४ च्या सुमारास त्यांनीं बदरीकेदाराकडे जें प्रयाण केलें, त्यानंतर त्यांच्यासंबंधीं कोणीं कांहीं ऐकलें नाहीं.

## मराठींतून ग्रंथरचना

श्रीचक्रधरांनीं स्थापलेल्या या महानुभावपंथाबद्दल एवढेंच सांगतां येईल कीं, हा पंथ श्रीमद्भगवद्गीतेंतील अहिंसातत्त्वावर आधारलेला असून महानुभावीय लोक, भगवद्गीता व श्रीचक्रधरांच्या मुखांतून निघालेले सूत्रपाठ यांना आद्यधर्मग्रंथांचा मान देतात. तसेंच श्रीदत्तात्रेय व श्रीकृष्ण या अवतारांना ते पूज्य मानीत असल्यानें श्रीमद्भागवताच्या अनुक्रमें एकादश व दशमस्कंधाना तेथें महत्त्व चढावें हें साहजिक आहे. तथापि या कारणामुळेंच महानुभावपंथांत चरित्रपर, स्थळवर्णनपर, टीकारूप असें विविध प्रकारचें वाङ्मय निर्माण झालें असून भास्करकवीश्वराचा शिशुपालवध व एकादशस्कंध, दामोदरपंडिताचें वच्छहरण, नरेंद्रकवीचें रुक्मिणीस्वयंवर, रवळोव्यासाचें सह्याद्रिवर्णन, पंडित विश्वनाथाचा ज्ञानप्रबोध व नारायण पंडिताचें ऋद्धिपुरवर्णन या 'साती ग्रंथां'चा तर नित्यपूजेंत अंतर्भाव करण्यांत आला आहे.

महानुभावीयांचें वाङ्मय संस्कृत व हिंदी या भाषांमध्यें असलें तरी मुख्यतः तें मराठी भाषेंतच असून, आपल्या अज्ञ अनुयायांना सहज समजण्यासाठीं मराठींतूनच धर्मग्रंथरचना केली पाहिजे अशी श्रीचक्रधरांची आपल्या शिष्यांना आज्ञा होती. श्रीचक्रधरांचा अवतार याप्रमाणें मराठी भाषेच्या वाङ्मयवृद्धीला मोठा उपकारक झाला असल्यानें, मराठी भाषाभिमान्यांनीं त्यांचें कृतज्ञतेनें स्मरण ठेवणें अवश्य आहे. या दृष्टीनें विचार करतांना महींद्रभट्टानें लिहिलेल्या श्रीचक्रधरांच्या 'लीळाचरित्रा'कडेच कोणाचेंहि लक्ष जाईल! महींद्रभट्टानें चक्रधरांच्या जीवनांतील लहानमोठे प्रसंग अशा कांहीं गोडव्यानें व जिव्हाळ्यानें रंगविले आहेत कीं, त्यांवरून त्या महात्म्याच्या स्वभावाच्या विविध मनोहर पैलूंचें वाचकाला स्पष्ट निदर्शन घडावें. आजकाल मोटमोठ्या व्यक्तींच्या आठवणींचा जसा त्यांच्या अगदीं अंतरंगांत शिरून कानोसा घेण्यास आपणास उपयोग होतो, तद्वत् महींद्रभट्टानें संकलित केलेल्या श्रीचक्रधरांच्या या अनेक लीलांनीं, त्यांच्या अगदीं सांनिध्यांत जाण्याचा आनंद आपणास उपभोगतां येतो.

महींद्रभट्टाच्या ग्रंथाच्या प्रस्तुत भागांत आलेल्या अनेक स्थलांच्या व व्यक्तींच्या नामोल्लेखानें आपणांस जसा तत्कालीन भौगोलिक, ऐतिहासिक व राजकीय परिस्थितीचा प्रत्यय येतो, तद्वतच चक्रधरांच्या निरनिराळ्या शिष्य-शिष्यिणींशीं झालेल्या त्यांच्या प्रासंगिक संभाषणांनीं, त्यांच्या विविध हालचालींनीं व त्यांनीं केलेल्या अनेक अद्भुत चमत्कारांनीं, त्यांचें रेखीव व्यक्तित्व, मनमोकळा स्वभाव, दैवी सामर्थ्य व्यक्त झाल्याशिवाय राहत नाहीं. चक्रधर हे आपल्या पंथाच्या रिवाजाप्रमाणें गावोंगांव अटण करीत व भिक्षेवर निर्वाह करीत. त्यांच्यासमवेत नागांबिकेसारख्या किंवा बाणेबाईसारख्या ज्या एक दोन शिष्यिणी असत, त्याच त्यांना निष्ठेनें जेऊंखाऊं घालीत. चक्रधरांनीं प्रत्यहीं उठावें, प्रातर्विधि उरकून भिक्षेस जावें, जें मागून आणलें असेल तें मग या शिष्यिणींनीं शिजवावें,












जेवण झाल्यावर तांबूलसेवन करून थोडी दुपारची वामकुक्षी करावी, व मग उठून चूळ भरून पुढील मुक्कामासाठीं एखाद्या गांवीं देवालयांत वस्ती करावी, असा त्यांचा नित्याचा क्रम होता. चक्रधर बहुतेक ठराविक वेळीं भिक्षेहून परत येत. पण केव्हां तरी थोडा इकडे तिकडे वेळ झाल्यास शिष्यिणींना ते कोठें चुकले काय अशी काळजी लागे; यावरून चक्रधरांच्या सहजप्रवृत्तीवर जसा प्रकाश पडतो, तसाच त्यांच्या शिष्यिणींच्या निष्ठेचेंहि कौतुक वाटल्यावांचून राहत नाहीं.

एकदां बाणेबाई चक्रधरांना नागूबाईच्या गुंफेहून ' त्र्यंबक'तीर्थाला नेण्यासाठी आली होती. चक्रधर तिच्याबरोबर कांहीं अंतर चालून गेले, पण पुढें ' त्र्यंबक'ला न जातां " या लागिं इतुका ऐसा त्रीयंबकु घेउनि या " असें म्हणून त्यांनीं पुढें येण्याचें नाकारलें. चक्रधरासारखे महात्मे " जेथें असतील तेथें तें तीर्थ " असें इतरांच्याहि बोलण्यांत आलें, व चक्रधरांच्या वरील गूढोक्तीचाहि तसाच कांहींसा अर्थ होता. यापुढें चक्रधर पुनः नागांबिकेच्या गुंफेस परत आल्यानें तिलाहि बरें वाटलें. याच पैठण-मुक्कामीं भोगनारायणाच्या देवळांत वस्ती करून असतांना नागांबिकेबरोबरच हांसुबाई ही चक्रधरांच्या भजनीं लागली होती. चक्रधरांची व ज्या भक्तांची दृष्टादृष्ट होई, त्यांची तात्काळ समाधि लागत असे, व याप्रमाणें नागांबिकेनेंहि समाधिसुख अनुभविलें होतें. तिला त्रिदोष झाला होता, तो आपल्या दोन दिवसांच्या सहवासानें आपण घालवून टाकला व तिसऱ्या दिवशीं तिच्या ठिकाणीं चित्कला प्रवेशली असें खुद्द चक्रधरांनींच सांगितलें आहे.

## निंदक भक्त बनले !

नागूबाई चक्रधरांच्या भजनीं लागली, त्यांचें ती उच्छिष्ट देखील सेवन करते, पाय धुतलेलें पाणी देखील पिते हें पाहून प्रथम हांसुबाई व पांडे हे चक्रधरांबद्दल वाटेल तसें अद्वातद्वा भकत होते, त्यांची यथेच्छ निंदा करीत होते. नागूबाईनें हा सर्व प्रकार चक्रधरांना निवेदन केला. पण त्यांनीं अधिक कांहींहि न करतां हांसूबाईला नुसती तिच्या नांवानें हाक मारतांच तिची समाधि लागली. या अद्भुत चमत्कारानें हांसुबाईची चक्रधरांच्या दैवी सामर्थ्याबद्दल खात्री होऊन त्यांची आपण व्यर्थ निंदा केली व आपल्यावर मोठेंच पाप आपण ओढवून घेतलें, याबद्दल तिला पश्चात्ताप होऊन ती त्यांची शिष्या बनली. पण इतके दिवस नागांबिकाच एकटी चक्रधरांवर भुलली होती, आतां ही हांसूबाईहि चळली हें पाहून आतां पांडे चक्रधराबद्दल तोंडाला येईल तें बोलूं लागले. नागूबाईनें ही गोष्टहि चक्रधरांना कळविली. तथापि चक्रधरांनीं कांहींहि न करतां मौन स्वीकारलें. पुढें एके दिवशीं चमत्कार असा झाला कीं, पांडयांना स्वप्नांत तांबडया लाल डोळयाच्या व लांब केसांच्या गदाधारी यमदूतांनीं परस्परच बडवून काढून, चक्रधर हे द्वारावतीचे चांगदेव राऊळ असल्याची ओळख पटवून दिली. या प्रसंगीं चक्रधर स्वतः मध्यें पडून यमदूतांपासून पांड्यांचें आपल्या हातानें निवारण करीत होते, हें त्यानें पाहिल्यावर चक्रधरांच्या कृपाळु स्वभावाची पांड्याला खात्री पटली. झोंपेंतून जागा झाल्यावर पांडे आपणांस चक्रधरांचें दर्शन घडविण्याबद्दल नागूबाईची विनवणी करूं लागला. पण चक्रधर तसे कसचे येतात ? त्यांना झालेला प्रकार अंतर्ज्ञानानें सर्व ठाऊक होताच. " बोलावल्याबरोबर येणारा मी काय नाथाचा बैल आहे ? " असें जरी ते वरवर म्हणाले, तरी नागूबाईच्या सांगण्यावरून ते पांड्याकडे आल्याशिवाय राहिले नाहींत, यांतच त्यांच्या भक्तवत्सलपणाचें बीज सांठविलेलें आहे. पांड्यानें चक्रधरांना दंडवत घातलें व चक्रधरांनींहि आपल्या दर्शनानें त्याच्या अंगांतील त्रिदोष घालवून त्यांच्यांत प्रेमकलिकेचा संचार करविला. त्या दिवसापासून पांडे चक्रधरांचा अंकित झाला. हांसूबाई काय किंवा पांडे काय हे प्रथम चक्रधरांचे निंदक असतां, चक्रधरांनीं त्यांना आपल्या सामर्थ्यानें व प्रेमळपणानें आपले भक्त बनविलें, हें या लीलेवरून पाहिलें म्हणजे गोल्डस्मिथच्या ' Deserted Village 'मधील " Fools, who came to scoff, remained to pray " या वचनाची सत्यता पटते.

आपली ओळख व सामर्थ्य पटविण्याच्या वरील-प्रसंगाप्रमाणेंच कोणी तरी चक्रधरांची अजाणतां उपेक्षा केल्यास त्याला ज्वरबाधेची परस्पर शिक्षा झाल्याकारणानें जसें त्यांचें निषेधार्थानें सामर्थ्य पटे, तसेंच सारंगपंडितासारख्याच्या अंगांतील पिशाच्च-बाधा काढून टाकण्यांत अथवा उपरिनिर्दिष्ट पांड्यांच्या







अंगांतला १६ दिवसांचा विषमज्वर घालविण्यांत त्यांचें परोपकारित्वच व्यक्त होई. शिवाय चक्रधरांची कोणी उपेक्षा केल्यास त्याला त्यांच्याकडून शिक्षा न होतां, ती परभारेंच अज्ञात रीतीनें होत असल्यानें चक्रधरांकडे त्या अपकृत्याचा दोष न येतां, त्यांचें अद्‌भुत शक्तिमत्त्वच उलट अनुभवास येई. सारंगपंडित तर भूतबाधेपासून मुक्त झाल्यावर त्यांचा भक्तच बनला. त्याच्या बोलावण्यावरून चक्रधरांनीं त्याला चासांच्या घरीं दर्शन दिलें. तथापि हा चास देखील कांहीं कमी नव्हता ! त्यानें देखील " मागें श्रीकृष्ण चक्रवर्तीच्या दर्शनानें जसा आनंद होत असें, तसा अकृत्रिम आनंद आतां अन्यत्र कोठें मिळेल काय ? " असा खोंचदार प्रश्न चक्रधरांना करून त्यांची परीक्षा पाहण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. पण चक्रधरांनींहि त्याला वृथा वादविवादानें उत्तर न देतां, त्याची समाधि लावून व तशा अकृत्रिम आनंदाचा लाभ त्याला घडवून आपण श्रीकृष्ण चक्रवर्तींचे अवतार असल्याचें आपल्या कृतीनेंच सिद्ध करून दाखविलें.

या सारंगपंडिताप्रमाणेंच उपाध्ये यानेंहि चांगदेवाच्या सांगण्यावरून चक्रधरांचें दर्शन घेतलें, व तो त्यांचा इतका परम भक्त बनला कीं, चक्रधरांच्या तोंडचा तांबूल सेवन करण्यांत त्याला कांहीं अवघड तर वाटलें नाहींच, उलट त्यानें तो प्रसादाप्रमाणें ग्रहण केला. पण आपला उच्छिष्ट तांबूल भक्षण केला तर आपल्या भक्तास त्याच्या आप्तसंबंधीयांकडून पंक्तिबाह्य ठरविलें जाईल, याकडे त्यांचें लक्ष वेधण्यास चक्रधर चुकत नसत. यावरून आपली सेवा करतांना आपल्यासंबंधीं अनन्यभाव कोणी अंधभक्तीनें राखावा अशी त्यांची बिलकूल इच्छा नसे, हेंच सिद्ध होतें.

## वत्सल, हळुवार स्वभाव

चक्रधरांच्या या चरित्रांतील, कोणाचें पिशाच काढणें किंवा कोणाच्या अंगांतला ज्वर उतरविणें यासारख्या लीलांत त्यांचें योगसिद्धिसामर्थ्य दिसून त्यांचें अलौकिकत्व आपणास पटत असलें, तरी त्यांचें खरें अंतरंग अथवा व्यक्तित्व स्फुट करणाऱ्या ज्या लीला येथें आपणास वाचावयास सांपडतात, त्यांच्यांतच चक्रधरासारख्या महात्म्यांची खरी महती सांठविलेली आहे. चक्रधर एकदा चांगदेवीं गेले असतां तेथें एका नर्तिकेची व त्यांची गांठ पडली. तिच्या नृत्यकलेनें ते संतुष्ट झाले व तिलाहि या गोसाव्यांच्या प्रशंसायुक्त प्रोत्साहनानें आपल्या कलेचें सार्थक झालेसें वाटलें. पण ती चक्रधरांच्या पदराला धरून जेव्हां त्यांना आपल्या घरीं बोलावूं लागली तेव्हां " मला दुसरीकडे बोलावलें आहे " अशा सबबीवर त्यांनीं ती वेळ कशी मारून नेली हें पाहिलें म्हणजे चक्रधरांच्या सोज्ज्वळ वर्तनाची व त्याबरोबरच दुसऱ्याला न दुखविणाऱ्या त्यांच्या हळुवार स्वभावाची साक्ष पटते. पण याहिपेक्षां धानायीशीं केलेल्या लीलांमध्यें त्यांचें जें वात्सल्य व सहजता व्यक्त झाली आहे, ती या अलौकिक पुरुषाचें लौकिकत्व सिद्ध करण्यास पुरेशी आहे. एवढा अधिकारी पुरुष एखाद्या लहान मुलीशीं कवड्या खेळण्यांत किंवा तिला काऊचिऊच्या गोष्टी सांगण्यांत आनंद मानतो, यांतच चक्रधरांच्या रसिक, भावनाप्रधान, व वत्सल हृदयाचें निदर्शन होण्यासारखें आहे.

चक्रधरांना लहान मुलांबद्दल जसें वात्सल्य वाटत होतें, तसें आपल्या भक्तजनांबद्दलहि त्यांना प्रेम व अभिमान वाटत होता. एकदां देमाइसा नित्याचा बाजारहाट करण्यासाठीं एका वाण्याकडे गेली असतां, वाण्यानें तिला फार आदरानें वागविलें व ही गोष्ट तिनें चक्रधरांना कौतुकानें सांगतांच, त्यांच्या तोंडून " तुम्हीं गेल्यावर तुमच्यासाठीं त्यानें इतकें केलें, त्यांत विशेष तें काय केलें ? " अशा अर्थाचे जे उद्गार निघाले आहेत, त्यांवरून आपल्या शिष्यशिष्यिणींना इतरांनीं मानानेंच वागविलें पाहिजे, अशी त्यांची सर्वसाधारण अपेक्षा असून, खुद्द चक्रधरांच्या व त्यांच्या शिष्यांच्या अधिकारावरून ती अनाठायीं होती असें म्हणवत नाहीं.

याहिपेक्षां चक्रधर आपल्या शिष्यांच्या स्वास्थ्याची विशेष काळजी वहात. थंडीच्या दिवसांत चांगदेवाला आपली पासोडी पांघरूण घालून आपल्या जवळ निजविण्यांत त्यांच्या औदार्यापेक्षां त्यांची आपुलकीच अधिक व्यक्त झाली आहे. पण एवढ्यावरून ते आपल्या नित्याच्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेबद्दल मोठी फिकीर करीत असें दिसून येत नाहीं. त्यांचा व त्यांच्याबरोबर असणाऱ्या शिष्यपरिवाराचा उदरनिर्वाह प्रत्येक गांवीं अगदीं ठराविक वेळीं केलेल्या भिक्षांदेहीवरच चाले. कित्येक वेळां कांहीं वाणसामान आणण्यास त्यांच्याजवळ पैसे असतच असें नाहीं, व अशा










एखाद्या अडचणीच्या प्रसंगीं आपल्या जवळचा अडकित्ता गहाण टाकून जरूर ते पैसे उभारण्यांत त्यांना कमीपणा वाटत नसे. चक्रधरांची बेफिकीर वृत्ति, दुसऱ्याचे पैसे फुकट न घेण्याची अयाचित सत्त्वस्थ वृत्ति तत्कालीं वाणी लोकांना देखील इतकी आदरणीय झाली होती कीं, त्यांचा अधिकार जाणून ते आपण अडकित्त्यावर दिलेले पैसे परत न मागतां, गहाण ठेवलेला अडकित्ता परत देत.

## गुरुभक्ति

तथापि 'लीळाचरित्रां'तील चक्रधर व त्यांचे गुरु श्रीगोविंदप्रभु यांच्या भेटीचे प्रसंग हा या ग्रंथाचा विशेष उल्लेखनीय भाग समजला पाहिजे. श्रीगोविंदप्रभूंची बालोन्मत्तपिशाचवृत्ति, त्यांची नाभिचुंबित दाढी, मोकळे केस, मोकळा कासोटा, गुडघ्यावर धोतर अशा थाटांतील कालीकभिन्न शरीरयष्टि इत्यादि बाह्य अथवा शारीरविशेषांचें येथें जसें आपणास आकलन होतें, तसेंच चक्रधरांना प्रेमानें सुताच्या मोगरीनें मारण्यांत व " येया आतां माझा होये " असें म्हणण्यांत अथवा 'तुं देवो ' असें चक्रधरांना संबोधण्यांत, श्रीगोविंदप्रभूंचें चक्रधरांबद्दलचें प्रेम व त्यांचा अधिकार व पात्रता जाणण्याचा त्यांचा मोठेपणाच व्यक्त होत असून, " एका देवानें दुसरा देव प्रकाशला" असा जो उल्लेख एका लीळेंत आला आहे, तो यावरून यथार्थ आहे असेंच म्हटलें पाहिजे. आपल्या गुरूंना निरनिराळ्या प्रकारचे खाद्यपदार्थ करून घालण्यांत, विशेषतः त्यांना आवडणारे उडदाचे वडे करून घालण्यांत व त्यांची वस्त्रपूजा करतांना ते 'नको, नको' म्हणत असतांना देखील त्यांना वस्त्र नेसविण्यांत चक्रधर किती दक्ष असत हें पाहिलें म्हणजे, एवढ्या महात्म्याच्या या गुरुभक्तीबद्दल कौतुक वाटल्यावांचून राहत नाहीं.

एकदा बाइसानें श्रीगोविंदप्रभूंचें वस्त्र झाडलें. कारण तें धुळीनें भरलें होतें. पण ही गोष्ट चक्रधरांना मुळींच न आवडून ते तिला म्हणाले कीं, " श्रीप्रभूंचें वस्त्र व तेथें रज असें कसें म्हणतेस ? हें रज असे कीं, जें ब्रह्मादिकांनाहि दुर्लभ." यावरून चक्रधर आपल्या गुरूंच्या वस्त्रधूलीला केवढे मानीत असत हेंच अशा प्रकारच्या लीळा सांगत आहेत. पुनः श्रीगोविंदप्रभु असेच एकदां चक्रधरांबरोबर एका मठांत गेले असतां, तेथील चाऱ्यानें (पुजाऱ्यानें) श्रीगोविंदप्रभूंना भोजनाबद्दल विचारलें व त्यांनीं होकार देतांच जेवणांत त्यांना रोटीबरोबर तेल वाढलें तर उलट चक्रधरांना मात्र त्याच पंक्तींत त्यानें रोटीबरोबर तूप वाढलें. पण हा पंक्तिप्रपंच चक्रधरांच्या लक्षांत येऊन त्यांनीं " तुपाला श्रीप्रभु अयोग्य व मी मात्र योग्य हें कसें ? " असा मोठा मार्मिक व खोंचदार प्रश्न विचारला. हा प्रसंग अगदीं साधाच होता. कदाचित् त्या चाऱ्याला चक्रधरांच्या सामर्थ्याचा जसा परिचय होता, तसा श्रीगोविंदप्रभूंचा अधिकार त्याला ठाऊक नसल्यानें, त्यानें वर उल्लेखिलेला पंक्तिप्रपंच केला असेल. पण आपल्या चौकस दृष्टीनें चक्रधरांनीं त्या चाऱ्याचा जो निषेध केला आहे, त्यांत त्यांची गुरुबद्दलची परमभक्ति व आदर स्पष्ट होतो.

अशा कांहीं स्वभावनिष्ठ लीळांबरोबरच कांहीं प्रसंगनिष्ठ लीळांचाहि अंतर्भाव या ग्रंथांत झाला आहे. चक्रधरकालीं, हठयोगाच्या मार्गानें अनेक प्रकारच्या सिद्धी मिळविणाऱ्या सिद्ध पुरुषांचा बराच सुळसुळाट झाला असून त्यांना परस्परांबद्दल विलक्षण मत्सर वाटत असला पाहिजे, असा येथें आलेल्या कांहीं उल्लेखांवरून तर्क करण्यास जागा आहे. चक्रधरांची महती कानावर आल्यामुळें, महादेवराय यादवासारखे राजेहि त्यांच्या दर्शनाला आलेले पाहून तत्कालीन ब्रह्मसानी या नांवाच्या बुवाला त्यांचा हेवा वाटला, व त्यानें आपल्या शिष्यांच्या हातीं चार जालीम विषें एकत्र करून तीं चक्रधरांकडे विड्यांतून पाठविलीं. पण त्यांचा चक्रधरावर कांहींच परिणाम झाला नाहीं असें पाहून ब्रह्मसानीनें विषाच्या फोडी चक्रधरांच्या प्रत्यक्ष तोंडांत घालण्याची व्यवस्था केली. या वेळीं मात्र त्या विषाचा थोडा परिणाम झाला. त्यांनीं सांगितलें कीं, " हें विष असें तसें जाणार नाहीं. एकाच्या निमित्तानें सर्व राष्ट्राला बोल लावला जाणार आहे, व मगच तें जाईल. " शेवटीं तें विष चक्रधरांनीं कह्यांत आणलें ही गोष्ट निराळी. पण अशा भूतदयाशील महात्म्याचाहि हेवा, मत्सर व छळ करणारे लोक त्या काळीं होते हें पाहिलें म्हणजे आपणास विशेष परिचित असलेली मंबाजीनें केलेल्या तुकारामाच्या छळाची शिवकालीन आख्यायिकाहि मग अतिशयोक्त वाटेनाशी होते.







श्री. ' वनफूल ' : अनु० – श्री. चंद्रोदय भट्टाचार्य व श्री. वा. ना. जठार

# कॅन्व्हासर

भांडणाचें कारण अर्थात् कात्यायनीच होती.

कात्यायनीच्या शब्दरूपी ठिणगीनें भैरवाच्या हृदयरूपी दारूच्या कोठाराला आग लागून स्फोट निर्माण केला. त्याच वेळीं जर त्याची हिरालाल नांवाच्या कॅन्व्हासरशीं भेट झाली नसती तर खालील घटना कांहीं घडली नसती.

बऱ्याच दिवसांपासून कात्यायनीच्या मनांत एक फॅशनेबल साडी विकत घेण्याची हौस होती. पैशाच्या अभावीं बेकार भैरव तिची ती हौस पुरवूं शकला नाहीं. परंतु चैन करणें आपल्याला पसंत नाहीं व ह्या चैनीला चटावल्यामुळेंच आपल्या देशाचा ऱ्हास होत आहे, अशी खोटी सबब सांगून तो आपल्या पत्नीचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होता.

पण कात्यायनी पतिव्रता असली तरी अशा खोट्या सबबींनीं समाधान मानणारी नव्हती.

ती म्हणाली : " जांभई देतां देतां ज्याचा जबडा आंखडून जातो, त्यानें कशाला खांद्यावर बंदूक घ्यावी ? कवडीची ऐपत नाहीं, त्यानें लग्न कशाला करावें ? "

फारच कठोर वाग्बाण !

तापलेला भैरव डोक्यावर थोडें तेल थोपटीत फणफणत बाहेर निघून गेला. दुपारच्या प्रखर उन्हानें चारी दिशा जळत होत्या. बाहेर आल्याबरोबर भैरवाला समोर एक लिंबाचें झाड दिसलें. सकाळपासून दांतण-देखील त्यानें केलें नव्हतें. भैरवानें लिंबाच्या झाडाची एक फांदी वांकवून कटकन् एक काडी मोडली....

"दंतमंजन घ्या हो ! दांतांकरितां उत्कृष्ट मंजन—"

भैरवानें वळून पाहिलें तो एक अगदीं अनोळखी मनुष्य हातांत लहानशी सूट-केस घेऊन त्याच्याकडे पहात आहे असें त्याला दिसलें.

त्याच्या चेहऱ्यावर मृदु हास्य होतें.

हे गृहस्थ म्हणजे कॅन्व्हासर हिरालाल होत. कॅन्व्हासर हिरालालचा ह्या खेडेगांवांत येण्याचा हेतु नव्हता. तो एका शहरांत जाणार होता. आणि जात देखील होता. परंतु आगगाडींत झोपीं गेल्यामुळें बिचारा 'ओव्हर-कॅरिड्' होऊन ह्या खेडेगांवांत येऊन पडला !

संध्याकाळच्या आधीं परत जायला कांहीं गाडी नव्हती. म्हणून थोडा ' बिझिनेस ' करतां आला तर पहावें या आशेनें बिचारा भर उन्हामध्यें चोहोंकडे फिरून पहात होता.

आश्चर्यानें भैरव म्हणाला, " आपली स्वारी इथें कुठून आली बुवा ? "

" दंतमंजन आहे. उत्कृष्ट दंतमंजन. दांतांतील कीड, हिरड्या सुजणें, पू होणें, रक्त येणें, तोंडाला वाईट वास येणें हें सर्व कांहीं बरें होईल, महाराज. उत्कृष्ट दंतमंजन आहे– "

" तें तर समजलें. परंतु आपण इथें कोठून आलां ? आम्ही इथें खेडेगांवांत शांतपणें रहात असतों. आपल्यासारखे लोक इथें आले म्हणजे –– "

" अहो वापरून तर पहा. उत्कृष्ट मंजन आहे –".

लिंबाची काडी चावीत चावीत भैरव म्हणाला, " दगड– "

हिरालाल हंसत म्हणाला, " नाहीं महाराज ! उत्कृष्ट मंजन आहे. एकदां वापरून तर पहा– ".

हिरालालच्या चमकणाऱ्या दांतांकडे पहात भैरव म्हणाला, " तुमचे दांत तर फारच सुंदर आहेत. तुम्ही काय हेंच मंजन वापरतां ? "

श्री ' वनफूल ' यांचें मूळ नांव बलाइचाँद मुखोपाध्याय असें आहे. ते बंगाली भाषेंतील एक विद्यमान प्रथितयश कादंबरीकार व लघुकथालेखक आहेत. ते पेशानें डॉक्टर (पॅथॉलाजिस्ट) आहेत. ' शरच्चंद्र चट्टोपाध्याय व्याख्यानमाला ' गुंफण्याकरितां कलकत्ताविद्यापीठानें त्यांना बोलावून त्यांचा गेल्या वर्षी गौरव केला. —का. सं.

आणखी थोडें हंसून हिरालाल म्हणाला, " होय, महाराज ".

भैरवानें एकदां थुंकीची पिचकारी मारून आपले मधले दांत बिचकले आणि लिंबाच्या काडीनें घासूं लागला.

हें दृश्य कांहीं पहाण्यालायक नव्हतें हें सांगायला नकोच !

" दंतमंजनाची एक डबी आपण घ्याल का ? " हिरालालनें ठोकलें. वेडेवाकडें तोंड करीत भैरव म्हणाला, " इथून चालायला लागा बरें ! तुम्ही लोक म्हणजे देशाचे शत्रू आहांत. जगांत जेवढ्या चैनीच्या फालतू वस्तू आहेत त्या सर्व आणून तुम्ही देशाला रसातळाला नेत आहांत. समजलें का ? "

असें म्हणून तो निर्विकार चित्तानें दांत घासूं लागला.

हिरालाल आपले सुंदर दांत बाहेर काढून पुन्हां एकदां हंसला. तो म्हणाला, " आपलं म्हणणं मला कांहीं समजलं नाहीं. देशांत दांतांच्या रोगांची कांहीं कमतरता नाहीं. "

एकदम उत्तेजित होऊन भैरव म्हणाला, " त्यांत तुमचें काय जातें ? निघून जा बरें ह्या गांवांतून ! मंजना-बिंजनासारख्या फालतू गोष्टी इथें कांहीं चालणार नाहींत ! "

हिरालाल कॅन्व्हासर असला तरी हाडामांसांचा मनुष्यच होता. तो म्हणाला, " तुम्ही काय ह्या गांवाचे मालक आहांत ? "

हें बोलणें अगदीं गैर नसलें तरी त्यामुळें भैरवाच्या स्वाभिमानाला धक्का बसला. भैरव बेकार आहे ही गोष्ट खरी. तसेंच त्याच्याजवळ फारशी विद्या नाहीं हेंहि खरें. परंतु त्याच्या अंगांत भरपूर ताकद आहे हेंहि तितकेंच खरें आहे. तो ह्या गांवाचा मालक नसला तरी हिरालालला तो गांवांतून हाकून लावूं शकतो. "ह्या चोरांनीं देशांतील अज्ञान तरुण-तरुणींना वेडें करून टाकलें आहे. अहो, घांसभर अन्न मिळण्याची आम्हाला ददात पडली आहे — आणि म्हणे दातांचें मंजन घ्या ! "

जोरानें एक पिचकारी मारून भैरव म्हणाला: "मी म्हणतों कीं तुम्ही गांवांतून चालायला लागा बरं. "

"गांवांतून हाकून लावणारे तुम्ही कोण सांगा बरं. "

भीमगर्जना करीत भैरव म्हणाला, " चालायला लागा — "

" आपल्यासारखे पुष्कळ पाहिलेत ".

ह्यानंतर तावडतोब धावून जाऊन भैरवानें हिरालालच्या थोबाडींत एक जोरानें थप्पड मारली.

भैरवाची ही वागणूक आश्चर्यकारक होती यांत शंकाच नाहीं.

परंतु ह्यापेक्षांहि आश्चर्यकारक अशी दुसरी एक घटना घडली. थप्पड खाल्ल्याबरोबर हिरालालच्या तोंडाचें बोळकें बनलें. त्याची कृत्रिम दंतपंक्ति एकदम बाहेर पडली !

आश्चर्यचकित झालेला भैरव आपल्या काळ्याभोर मिशांकडे पहात आहे असें पाहून हिरालाल किंचित् हंसून म्हणाला : " होय साहेब, तें देखील आहे माझ्या जवळ. उत्तम प्रकारचा कलप देखील मी ठेवतों. घ्याल का ? उगाच कशाला मारझोड करतां साहेब ? गरीब मनुष्य आहे. हाच धंदा करून कसाबसा संसार भागवतों. माझ्या ह्या उतार वयांत माझा मिळवता मुलगा मरून गेला — "

भैरव थोडा वेळ हतबुद्ध होऊन स्तब्ध उभा राहिला. भानावर आल्यानंतर तो म्हणाला: " बरें द्या एक मंजनाची डबी. "

---

## प्रश्न — !

प्रश्नहि गेला ... उत्तर विरले
फक्त राहिली
उत्तरांतली
भिणभिणणारी रात.
जपत मनांतील
तुझ्या स्मृतीची
संथ ... कांपरी ज्योत.

— रामकुमार








( २ ) आधुनिक काल : श्री. प्रभाकर माचवे

# मलयालम् साहित्याचा संक्षिप्त इतिहास

'नवभारता'च्या मागील जून १९५५ च्या अंकांत मलयालम् साहित्यांतील सुमारें १७ व्या शतकापर्यंत होऊन गेलेल्या कृष्णगीतकार चेरुश्शेरी, रामायणमहाभारतभागवतादि लिहिणारे एळुत्तच्छन व 'थुल्लल'कार-कुंचन नंबियार इत्यादि साहित्यिकांच्या रचनांचा आढावा पूर्वी घेतलाच आहे. मध्ययुगांतील या बृहत्त्रयी-प्रमाणेंच रामपुरत्तु वारियर याचे 'कुचेलवृत्तं वांचिप्पाट्टु' ( सुदामचरित्र नौकागीत ) फार प्रसिद्ध आहे. मध्ययुगांत कैक कीर्तनेंहि रचलीं गेलीं. वेदांतकीर्तन नीत्युपदेशांनीं भरलेलें आहे.

अठराव्या शतकाच्या मध्यकाळांत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार कोचिन-राज्यांत होऊं लागला. वेलस्लीचा अम्मल तेथवर पोंचला होता. केरलवर्मा नंपुराननें ( १८४५-१९१४ ) 'अभिज्ञानशाकुंतला'चें भाषांतर याच काळांत केलें. त्यांना 'केरलकालिदास' म्हणतात. गर्भ-श्रीमंत स्वातितिरुनाल रामवर्मा या राजानें हिंदींत देखील पद्यरचना केली आहे. १८१३ सालीं हा गादीवर आला. तिरुवितांकुरच्या या राजानें विद्येला बरेंच प्रोत्साहन दिलें, मंदिरांचा जीर्णोद्धार केला. त्याच्या मतें—

' संगीत साहित्य रसायलोके
कर्णौद्वयौ कल्पितवान् विधाता '.

कथाकालक्षेप किंवा हरिकथेची पद्धतहि याच राजानें सुरू केली. 'कुचेलवृत्तं' व 'अजामिलमोक्षं' संस्कृतांत या राजानें रचलें.

आणखी कांहीं नंपूतरी ( नंबुद्रि ) कवि या काळीं झाले. पण सर्वांची रचना रूढ वृत्तांत व रूढ पद्धतीनें लिहिलेली आहे. यांतीलच ' उमाकेरलं ' एक प्रसिद्ध रचना आहे. रीतिबद्ध काव्याचा एक नमुना म्हणजे राजराजवर्मा – प्रस्थानांत काव्याबद्दल पुढील नियम घालून देण्यांत आले :

१. द्वितीयाक्षर प्रासाला इतर प्रासांपेक्षां जास्त महत्त्व देऊं नये. २. कथामर्म शेवटपावेतों तसेंच निभवलें पाहिजे ३. परिणामगुप्तता महाकाव्यांत असावी. ४. पात्ररचना स्वाभाविक असावी ५. अप्रासंगिक वर्णनें असूं नयेत. त्यानें रसभंग होतो. ६. शब्दालंकारांपेक्षां अर्थालंकार जास्त महत्त्वाचे. ७. हृदयंगम सादृश्यावांचून उपमा देऊं नये. ८. केवळ वर्णनासाठीं वर्णन करूं नये. ९. औचित्यभंग होऊं देऊं नये. १०. अलंकारहि अमित नसावे.

या नियमानुसार रचना असली कीं मग सहृदयांना ईश्वराची अशी प्रार्थना करावी लागणार नाहीं :

" पोट्टश्लोकङ्ङ्तुण्डाळुं
दुष्टक्कूट्टं नशिक्कणें ! "

('तुच्छ श्लोक रचणाऱ्यांचे दुष्ट संघ नष्ट होवोत!') 'केशवीयं' काव्य या सर्व नियमांचें पालन करून लिहिलें आहे.

यानंतर केरळ-भाषेंत एकुणिसाव्या शतकांत संदेश-काव्य, विलापकाव्य व खंडकाव्यांचें जणूं पेंवच फुटलें! 'उण्णिनीलिसंदेश' हें यांतील मणिप्रवालशैलींतील श्रेष्ठ काव्य. केरलवर्मा मेहुणा असूनहि त्याच्यावर राजा फार नाराज झाला. त्यानें ' क्षमापणसहस्त्रं ' काव्य लिहिलें तरी तो खूष होईना. मग त्यानें ' यमप्रमाणशतकं ' लिहिलें. शेवटीं त्यानें आपल्या प्रेयसीला संदेश पाठविण्याचें ठरविलें. वंचिराजानें त्याला अपरंपार दुःखांत कसें लोटलें आहे या आशयाच्या मंदाक्रांतेपासून काव्य सुरू होतें —

'श्रीमान् वंचिक्षितिपतिभुजंगर्क्षजन् लक्ष्मियाकुं
सामान्यं विट्टेपुरुगुणा भोगयां भागिनेयीं
प्रेमावेशप्रियतमवियोगत्तिनालार्तयाक्कि –
सीमातीतें कदनजलधौ केरळं तळ्ळिविट्टान् ॥'

व त्याचा शेवट ' शिवास्ते पन्थानः सन्तु ' नें होतो.

विलापकाव्यें लिहिण्याचा प्रथम प्रयत्न सी. एस. सुब्रह्मण्यन् पोट्टीनें केला. आपल्या लहान मुलीच्या मृत्यूवर त्यानें एक ' विलाप ' लिहिला आहे. त्यानंतर नालपाट्टु नारायणमेनवन् यांचें ' कण्णु नीरत्तुळि ' व कुमारन् आशान याचें ' विलाप ' व ' प्ररोदन '



अनुक्रमणिका

हीं प्रसिद्ध आहेत. ' कण्णुनीरत्तुळ्ळि ' म्हणजे अश्रुबिंदु हें एक उत्कृष्ट खंडकाव्य आहे. पत्नी-वियोगावर ही रचना असून आपल्या मराठींतील ' विरहतरंगा ' प्रमाणें प्रसिद्ध आहे. या खंड-काव्यांत इंग्रजी काव्याची छाया – बाह्य सृष्टीवर मानवी शोकाचा आरोप इत्यादि बाबतींत – दिसून येते. गडकऱ्यांच्या 'घुबडा'ची आठवण पुढील पंक्तींतून होते :

कारिन् करिकंट्टकळ् वक्किनङ्ङि्
ङ्ङ्नेकमट्टां उडुपास्थिखंडं ।
चारं मुपुक्के चुडलक्कळंपो––
लिरुन्निता रात्रियिलन्तरीक्षं ॥

( ' आकाश जणूं स्मशानभूमि आहे. त्यावर सर्वत्र राख सांडलेली आहे. मेघखंड कोळशाप्रमाणें व नक्षत्र-गण अस्थिखंडाप्रमाणें आहेत ! ' )

मलयालम् भाषेंत सर्वश्रेष्ठ विलापकाव्य कुमारन् आशानचें ' प्ररोदनं ' हें आहे. केरलपाणिनि ए. आर्. राजराजवर्मा नंपुरान याच्या अकालमृत्यूवर हें आधारलेलें आहे. या काव्यावर इंग्रजी विलापिकांचा प्रभाव फार स्पष्ट आहे. शार्दूलविक्रीडित छन्दांतील हें काव्य अत्यंत संस्कृतप्रचुर आहे.

आधुनिक काळांतील कवींमध्यें तीन कवींचीं नांवें बृहत्त्रयी म्हणून मानलीं जातात : १. कुमारन आशान २. उळ्ळूर परमेश्वरय्यर ३. वळ्ळत्तोळ नारायण मेनवन्.

## कुमारन् आशान

आशान हा 'अवर्ण' किंवा अधःकृत मानल्या जाणाऱ्या हरिजन वा दलित जमातींतील कवि. वीण पूवु ('पतित पुष्प'), सिंहप्रसवं, नलिनी, लीला, चिंताविष्टयाय सीता, दुरवस्था, चांडालभिक्षुकी, प्ररोदनं– इत्यादि खंडकाव्यें व बालरामायणं, बुद्धचरितं आदि पूर्णकाव्यें ह्या याच्या कृती आहेत. याशिवाय सौंदर्यलहरी, मेघसंदेशं, प्रबोधचंद्रोदयं या संस्कृत कृतींचा पद्यानुवादहि आशाननें केला आहे.

' वीण पूवु ' किंवा 'सुकलेलें फूल' ही ४१ श्लोकांची कविता आहे. यांत या पुष्पाराशीचें मानवीकरण करून पूर्वी तिचा जन्म, पालन-पोषण कसें झालें, या सर्व अवस्थांचें वर्णन आहे. बाल्य, तारुण्य व शेवट यांचें मार्मिक चित्रण आहे. शेवटीं कवि म्हणतो कीं " हे पुष्पा ! तूं व मी सहोदरच ! दोघांची निर्मिति करणारा एकच हात आहेना ! "

' सिंहप्रसवं ' ही तिरुअनंतपुरम् ( त्रिवेंद्रम् ) येथील मृगशालेंत किंवा प्राणिसंग्रहालयांत एका सिंहिणीनें दोन पुत्रांना जन्म दिला या घटनेवर लिहिलेली कविता आहे. ' नलिनी ' व ' लीला ' हीं प्रेमकथाप्रतिपादक खंडकाव्यें आहेत. हींहि करुण काव्यें आहेत. नलिनी योगी झालेल्या दिवाकराच्या प्रेमांत योगिनी बनून रानोमाळ हिंडते. या काव्यांत कायिक प्रेमापेक्षां आध्यात्मिक प्रेमावर जास्त भर आहे. दिवाकर तिला म्हणतो—

" स्नेहमामखिलसारमूषियिल
स्नेहसारमिह सत्यमेकमां "

('स्नेह जगतांतील अखिल सार व स्नेहाचें सार सत्य आहेच' ). दोघांच्या प्रेमामुळें दोघांचीं अन्तःकरणें पवित्र होतात. प्रेमिक प्रियकरणीस ' उत्तमे ' ' ज्ञानिनी ' अशीं संबोधनें वापरतो.

' लीला'काव्यांत आशान ध्येयवादी पातळीवरून खालीं उतरला आहे. या खंडकाव्यांत ' अभागी कमल ' प्रमाणें वैधव्य-संतप्त नायिकेचें चित्र आहे. परंतु शेवटीं तिचा खरा पहिला प्रियकर जो विंध्याटवींत उन्मत्तावस्थेंत हिंडतो तो तिला सांपडतो. लीला व मदन रेवा-नदींत जलसमाधि घेतात.

वाल्मीकि आश्रमांतील सीतेवर ' चिंताविष्टयाय सीता ' नांवाचें काव्यहि असेंच तत्त्वज्ञानप्रधान आहे. यांत जागोंजागीं सूक्ती विखुरलेल्या आहेत. नागरिकांच्या परस्त्रीनिंदेवर बरीच टीका आहे. सीतेचा सारखा आपल्या मनाशीं हाच प्रश्न — "मला घरांतून हाकलून लावण्यापूर्वी जर रामानें मला विचारलें असतें तर काय झालें असतें ? ". पण रामावर रागावली तरी शेवटीं सीता परत आदर्श पतिव्रतेप्रमाणें– सुधाकराच्या सिंधूप्रमाणें स्वतःच्या नशिबालाच दोष लावते, पृथ्वीमातेला हंबरडा फोडून बोलवते व पृथ्वी येऊन तिला पोटाशीं घेते.

आशानचीं ' दुरवस्था ' ' चांडालभिक्षुकी ' व ' करुणा ' हीं काव्यें अधिक सामाजिक आशयानें भरलेलीं आहेत. त्यांतून अंत्यजांचीं दुःखें वेशीवर टांगण्याचा प्रयत्न केला गेला आहे. पुलयर, परपर मानल्या जाणाऱ्या अवर्णांतील सावित्री नांवाची एक मुलगी मोपल्यांच्या अत्याचारांना कंटाळून एका अंतर्जन








ब्राह्मणाच्या झोंपडींत येते. व तेथेंच ती सत्यवानाच्या सावित्रीप्रमाणें त्या चात्तनबरोबर नांदते. 'चंडाल भिक्षुकी' काव्यांत बुद्धाचा शिष्य आनंद व बालिकामातंगी या मातंगजातकावर रचना केली आहे. तहानलेला आनंद तिला म्हणतो — "मला तुझी जात नको. पाणी हवें आहे. हे पुण्यशालिनी! तुझ्या हातून निघणाऱ्या स्फटिक-स्वच्छ जलाचा एकेक बिन्दु तुझ्या अंतरात्म्याला अनेकानेक सुकृतहार अर्पण करील." मूळ असें --

" पुण्यशालिनी ! नी पकर्नीट्टमी —
तण्णीर तन्नुटे ओरोरो तुळ्ळियुं
एण्णमट्ट सुकृतहारङ्ङ्ळ निन्
अन्तरात्माविलर्पिक्कुन्नुंण्टावां "

मातंगी आनंदाचें अनुकरण करीत भिक्षुणी बनते. असें हें कथानक आहे. या काव्याचें नृत्यनाट्य मी १९५४ सालीं नवी दिल्ली येथील मलबार असोसिए-शनच्या वार्षिकोत्सवांत पाहिलें.

' करुणा ' काव्यांत बुद्धाचे शिष्य उपगुप्त व मथुरेची गणिका वासवदत्ता यांचें कथानक आहे. हें काव्य दोन खंडांत आहे. टागोरांच्या सुप्रसिद्ध ' संन्यासी उपगुप्त मथुरानगरीच तीरे ' या पंक्तीनें सुरूं होणाऱ्या कवितेची ( - या बंगाली कवितेचे मराठी मुक्तछंद भाषांतर श्री. चिं. द्वा. देशमुख यांनीं ' अभिरुचीं'त प्रसिद्ध केलें होतें - ) छाया आहे.

' ग्रामवृक्षत्तिले कुयिल ' ( ' खेड्यांतील झाडावरील कोकिळ' ) हें आशानचें दुसरें एक काव्य. मुलांकरतांहि त्यानें कांहीं कविता लिहिल्या. कुमारन् आशानला आपल्या बालकवीप्रमाणें अल्पवयांत काळानें हिरावून नेलें.

## उल्लूर परमेश्वर ऐयर

आधुनिक कवि-बृहत्रयींतील दुसरे प्रसिद्ध कवी म्हणजे उल्लूर परमेश्वर ऐयर. दरिद्र ब्राह्मणकुळांत जन्मून स्वप्रयत्नानें मोठा झालेला हा कविशिरोमणि. पंडितवरेण्य केरलदेववर्मन् हे उल्लूरचे गुरू. 'उमाकेरळं' त्याचेंच प्रसिद्ध काव्य. अमाप शब्दभांडाराबद्दल उळ्ळूर-ची ख्याति आहे. पिंगला वेश्येच्या कथानकावर त्यानें खंडकाव्य लिहिलें आहे. ' कर्णभूषण'हि असेंच महा-भारतावर आधारलेलें कथानक आहे. त्यांच्या काव्यांत उद्बोधनाचा स्वर फार प्रामुख्यानें दिसून येतो :

' जीवितप्पोरिलपजयं तेड्डानें
यौवनयुक्तनां आयुष्माने !
एन्तु मेल् वेंटतेन्नेतुमरियाते
हन्त ! नी निल्कयो सोदरने !
पोरुं तळर्न्नेतु, पोरुतळर्न्नेतु
पूरुष चैतन्य पोलत्तिंटेये ! '

( अर्थः " जीवनयुद्धांत हार खाल्लेल्या तरुणा ! माझ्या चिरंजीवा ! किंकर्तव्यतामूढ होऊन कां उभा आहेस ? माझ्या भावा ! असा क्षीण नको होऊं. थकूं नकोस. तूं पुरुषचैतन्याचा अंकुर आहेस ! " )

' नर हो न निराश करो मनको ! ', ' कुछ काम करो, कुछ काम करो ' हें मैथिलीशरणांचें या शतकाच्या आरंभीचें हिंदी उद्बोधनगीत याच आशयाचें आहे. ' तुतारी ', ' डंका ' इत्यादींतील सूर तोच. नझरुलचें ' आगे चल आगे चल भाई ' हें बंगाली गीतहि तसेंच व जोश मलीहाबादीचें ' रवां दवां बढे चलो ' अशाच प्रकारचें उर्दू संघगीत. थोड्याशा वर्षांच्या अंतरानें या शतकांत विशींत व तिशींत अशा कवितांचा फार जोर होता.

' चित्रशाला ' या उळ्ळूरच्या दुसऱ्या काव्याचा विषय मिस कॅथॅराइन मेयोच्या पुस्तकांतील हिंदी स्त्रियांच्या बदनामीला उत्तर देणें, हा होता. या काव्यांत भारतीय स्त्रियांच्या प्राचीन गौरवाचा मोठा भव्य इतिहास दिला आहे, व शेवटीं अमेरिकन स्त्रियांना उपदेशाच्या चार गोष्टी सांगण्यांत आल्या आहेत.

## श्री. वळ्ळत्तोल नारायण मेनवन्

बृहत्रयींतील तिसरे कवी श्री. वळ्ळत्तोल नारायण मेनवन्. 'कलामंडला'चे संस्थापक व कथकलीचे पुन-रुद्धारक म्हणून यांची कीर्ति फार मोठी आहे. यांनीं 'चित्रयोग' नांवाचें महाकाव्य लिहिलें आहे. ऋग्वेदाचें संपूर्ण पद्यबद्ध भाषांतर यांनीं केलें असून साहित्य अकादमीनें त्यांना पंधरा हजार रुपये या कार्याच्या प्रकाशनार्थ दिले आहेत. यांच्या कवितांचें इंग्रजी व रशियनमध्यें भाषांतर झालें आहे.

आशानच्या 'करुणे'चा व उळ्ळूरच्या 'पिंगले'चा विषय जसा गणिका आहे, तसाच वळ्ळत्तोळच्या ' मरियमु मग्दिलिनु ' या काव्याची नायिकाहि पुंश्चली परंतु येशू ख्रिस्ताच्या पवित्र सान्निध्यांत सती झालेली अशी मेरी मॅग्दलेन् आहे. या ग्रंथांचें इंग्रजी








रूपांतर मिळतें. यांत कवीनें मेरीची तुलना कुञ्जेशीं केली आहे.

' बंधनस्थानाय अनिरुद्धम् ' हें उषा-अनिरुद्ध कथानकावर आधारलेलें काव्य. तसेंच गाथा-सप्तशतीचा ' ग्रामलक्ष्मीसौभाग्यम् ' नांवाचा पद्यानुवाद, 'शिष्यनुं मकनुं' मध्यें परशुराम व गणेश यांचा द्वंद्वयुद्धप्रसंग, 'गणपति ', 'पिता-पुत्री' इत्यादि कृती प्रसिद्ध आहेत. ' साहित्यमंजरी 'चे सात भाग, ' स्त्री ' ' विपुकणि ', बापुजी इत्यादि अनेक काव्यें त्यांनीं लिहिलीं.

## ' डोंगरी उंदराचें पत्र '

महाराष्ट्रीयांना महत्त्वाचें वाटेल असें शिवाजी-महाराजांनीं जयसिंहास लिहिलेल्या पत्रावर आधारलेलें वीरकाव्य फार सुंदर आहे. त्याचें नांव ' काट्टेलियुडे कत्तु ' ( ' डोंगरी उंदराचें पत्र ' ). त्या संपूर्ण काव्याचा अनुवाद येथें देत आहों.

१. "आमच्या रक्तानें ज्याच्या खड्गमुष्टी माखलेल्या आहेत, त्या दुष्ट धर्मध्वंसक औरंगजेबाची आज्ञा शिरोधार्य मानून, स्वाभिमानी पूर्वजांनीं दाखविलेला राजमार्ग सोडून, आपल्या भावाबरोबर लढण्यासाठीं येत आहांत काय ? आश्चर्य आहे !

२ "आपलें चारित्र्य शुद्ध राखूं इच्छिणाऱ्या अत्यंत कुलीन हिंदु कुटुंबांचीं घरें ज्याच्यामुळें आक्रंदनानें भरून गेलीं त्या दुष्टासाठीं, शत्रूच्या स्वाधीन होऊन आम्ही भावांनीं आपापसांत लढावें व त्या परक्यांचा जयस्तंभ उभारावा ! त्याकरितां स्वरक्तानें भूमि आर्द्र करावी ! वा रे औचित्य !

३ "परस्परस्पर्धेमुळें विलग होऊन आम्ही उभे राहतों व विदेशी आक्रमकांना विजयप्रासादांत प्रवेश करण्याकरतां विस्तीर्ण राजमार्ग बनवून देतों. जर आपल्या सुज्ञ, विवेकी पूर्वजांप्रमाणें आम्हीहि खांद्याला खांदा लावून उभे राहूं तर किती बरें बरें झालें असतें ? मग भारतवर्षाच्या रक्षणाकरतां दुसरी तटबंदी लागती ना ?

४ " त्या राजनामधारी दुर्मतीसमोर बद्धांजलि होऊन उभे राहण्यासाठींच का हे दोन सशक्त हात तुला देवानें दिले आहेत ? हे बुद्धिशाली महाराजा जयसिंहा ! त्या हातांना आदेश दे कीं ते आयुधधारण करून आपल्या जन्मदेशाला जंगल बनविणाऱ्या व्याघ्रांची शिकार करोत

५ " जर या देशांत स्वतःचा विजयध्वज उभारण्यासाठीं येत असाल तर अवश्य या. त्याकरितां मी स्वतःचा प्राण द्यायला तयार आहे. पण या मदमत्त मोंगलसरदाराच्या पायाखालीं तुडविण्यासाठीं दक्षिणापथाचा एक धूलिकणहि मिळणार नाहीं.

६ " जे अत्यंत दीन आणि अनाथ त्यांचें मर्दन केल्यामुळें जो घाम निघाला त्यामुळें मोंगलांच्या हातांतील राजदंड घसरूं लागला आहे. भारतवर्षाचा किरीट धारण करण्याची योग्यता गोल टक्कल असलेल्या डोक्याला नाहीं. या अनौचित्याला आधीं आळा घाल. मग आवश्यकता असेल तर आपण परस्पर युद्ध करूं.

७. " जर हें तुला कबूल नसेल व म्लेंच्छ-परिवृत यवनराजाची सेवा करतांना आपल्या भावांशीं लढणेंच तुम्हाला आवडत असेल, तर मित्रा ! सुस्वागतम् ! वीर रजपुतांच्या मुख्य नेत्याचें योग्य आतिथ्य माझी भवानी ( तरवार ) करील !

८. " क्षत्रियलक्ष्मीचा अनुग्रह मस्तकावर असूनहि नीचांची आज्ञा मस्तकावर धारण करणाऱ्या मित्रा ! आपल्या स्वामीला विचार कीं या प्रकारें दलितमर्दित हिंदूंच्या अश्रुप्रवाहानें आर्द्र झालेल्या भूमीवर, तुमचें सिंहासन कुठवर टिकणार ?

९. " आपली जन्मभूमि, सहोदर, धर्म, आचार या सर्वांचें रक्षण करणारा शिवाजी जोंवर त्याच्या नसांतून वाहणाऱ्या, राजर्षीच्या रक्ताचा एक थेंबहि शिल्लक राहील तोंवर आपलें खड्ग चालवीत राहील."

मूळ मलयालम् कवितेचे प्रथम व अंतिम श्लोक असे :

१. अन्तस्सिल कुलपूर्वर पोय वषिविट्टस्मन मतच्चोरयाल्
कुंतत्तंडिनु चायमिट्टु भुवनप्रध्वंसमार चेय्त्रितो ।
अन्तर्गर्वोटरंगसीबवनधर्मार्थं नियोगिच्चते–
ट्टेत्तत्थत्मुतं ई सगर्भ्यनोट्टेकॅत्तन्नु एन्नो भवान् ?

९. स्वन्तं मातृधरित्रि सोदर मताचारङ्ङ ळेन्नीवक–
य्केन्तल्पं क्षतियुं पेडाते परिपालिकुन्न कार्यात्तिनाय्
तन तंकपिडिवाळ् शिवाजि पेरुमारीडुं तदङ्गत्रिलनि-
न्नन्तर्लीन नृपर्षिपौरुषमोलिच्चोट्टुक्कोडुंडुं वरे ॥

या कवीला साम्यवादी लोकांनीं अलीकडे बरेंच उचलून धरलें आहे. व मलाया, रशिया देशांचें परिभ्रमणहि या वृद्ध, बधिर व इंग्रजी न जाणणाऱ्या महाकवीनें केलें आहे.











या महाकवीनें स्वदेशी-आंदोलनाच्या आरंभीं चरख्याविषयीं एक प्रसिद्ध गीत रचलें होतें व तें घरोघरीं गाइलें जात असे. या कवींचें स्वाक्षरीसकट एक रेखाचित्र मी डिसेंबर १९५४ मध्यें समस्त-केरळ-साहित्य-परिषदेंत गेलों असतां काढलें. त्यांच्यावर मी एक हिंदी लेख पूर्वीच १९५२ सालीं माझ्या 'व्यक्ति और वाङ्मय' या पुस्तकांत लिहिला होता.

'कालियमर्दन' काव्यांत कवि वळ्ळत्तोळ म्हणतात – "त्रिभुवनांना ध्वस्त करण्याचा गर्व करणाऱ्या दुष्टा! तूं कितीहि आपला फणा उंच केलास तरी कर्मभूमीचा एक लहानसा पाय तुला लाथ मारून खाली पाडण्यास समर्थ आहे." रामधारीसिंह 'दिनकर' या हिंदी कवीनेंहि "तान तान फन व्याल कि मैं तुझपर बांसुरी बजाऊं!" असें प्रसिद्ध गीत कालियामर्दनाच्या रूपकाचा अहिंसापर अर्थ लावीत लिहिलें आहे.

## जी. शंकर कुरुप

या बृहत्त्रयीनंतर आणखी कैक कवी झाले आहेत. उदाहरणार्थ, बी. सी. बालकृष्ण पणिक्कर, कण्टूर नारायण मेनवन, कोडुङ्ल्लूर कुंचिकुट्टन् तंपुरान, मुलूर एल्. पद्नाभ पणिक्कर इत्यादि. या सर्वांमध्यें जास्त चमकून उठणारे जी. शंकर कुरुप होत. यांनीं मलयालम् भाषेंत टागोरांच्या धर्तीवर संकेतात्मक भावगीतें लिहिलीं. यांना मलयालम् भाषेंत 'प्रतिरूपात्मक' (सिंबॉलिक) म्हणतात. हिंदींत 'प्रतीकवादी' शब्द रूढ आहे. 'साहित्यकौस्तुभं' नांवाच्या तीन खंडांमध्यें त्यांची कविता प्रसिद्ध झालेली आहे. 'चेंकतिरुकळ्' ('लाल किरणांचा समूह') हा दुसरा कविता-समाहार व 'भारतहृदयं' तिसरा.

'भारतहृदयं' काव्यांतील पुढील पंक्ती भा. रा. तांब्यांची 'साम्राज्यशाही' व कुसुमाग्रजांची 'जा जरा पूर्वेकडे' या कवितांची आठवण करून देतात.

स्वतःला सुसंस्कृत मानून स्वातंत्र्यगान गाणाऱ्या साम्राज्यमोही (जपानदेशा) तूं चुकेला शिकारी आहेस. तुझ्या मोहनगानाला बळी पडणारा भारतवर्ष निर्बोध हरिण नाहीं.

"वा म्हणे! मुक्त करूं! वा! प्रशांतमहासागराच्या नीलवर्ण तटदेशांकडे पहा. त्यांना मुक्तिदान कसें मिळालें आहे! ते निश्चेष्ट होऊन पडले आहेत."

'रक्तबिंदु' नांवाच्या कुरुपाच्या दुसऱ्या काव्यांत गेल्या महायुद्धांत भारताच्या तटस्थ भूमिकेचें समर्थन व युद्धविरोध आहे. गुजराथी कवि उमाशंकर जोशी यांचें 'विश्वशांति' व डॉ. ना. ग. जोशी यांचें 'विश्वमानव' हीं अशाच प्रकारचीं काव्यें. आपल्या या काव्यांत कुरुप म्हणतात— "जयलक्ष्मी यालाच आपला अलंकार बनविणार. कारण हा रक्तबिंदु नव्हे, या रत्नांत विश्वशांति निवास करते.'

## सरदार कोवलिन माधवन् पणिक्कर

सरदार कोवलिन माधवन् पणिक्कर यांनीं अनेक काव्यें व चंपू लिहिले आहेत. 'चिंतातरंगिणी', 'भूपसंदेशं', 'संध्यारागं', 'अपक्वफलं', 'कुरुक्षेत्रत्तिले गांधारी', 'चाटूक्ति-मुक्तावली', 'हैदर-नायकन्', 'रसिकरसायनं', 'बालिकामतं', 'पकीपरिणयं' इत्यादि त्यांचे काव्यग्रंथ होत. त्यांनीं उमर खय्यामच्या काव्याचें व मेघदूताचेंहि पद्यबद्ध भाषांतर मलयालम्मध्यें केलें आहे. अलीकडे ते सोफोक्लीसच्या नाटकांचा पद्यानुवाद करीत आहेत. चीन व मिसर देशांतील आपल्या दौत्यकाळांत त्यांनीं येनानवर व सुएझच्या आखातावर दोन मोठालीं कवनें रचलीं आहेत. या कवनांचा हिंदी अनुवाद रत्नमयीदेवी दीक्षित या करीत आहेत.

वरील विवेचनावरून कदाचित् असें वाटेल कीं मलयालम्मध्यें काव्यवाङ्मयच विशेषेंकरून आहे. पण गद्यांतहि मलयालम्मध्यें आधुनिक काळांत खूपच प्रगति झाली आहे. जोर्ज मात्तन, रेवरेंड गुंटर्ट, रेवरेंड बैली, रेवरेंड जोझेफ पिट, गार्तुवैट या सर्व मिशनरी लोकांनीं केरळ भाषेची फार मोठी सेवा केली आहे.

## गद्य वाङ्मय

केरळी गद्याचें जनकत्व केरळ-कालिदासाकडेच आहे. पाठमाला (तीन भाग), विज्ञानमंजरी, सन्मार्गप्रदीपं, घनतत्त्वनिरूपणं, शैशवावस्था, भारतेतिहास, तिरुवितांकुर-इतिहास, विज्ञान-संग्रहं, महच्चरित्रसंग्रहं, सन्मार्गविवरणं हे त्यांचे ग्रंथ. 'अकबर' नांवाची एक कादंबरीवजा गोष्टहि आहे. पण ती फारच जुन्या पद्धतीनें लिहिलेली आहे. अप्पु नेदुङ्ङाडीची 'कुन्दलता' ही मलयाळम्-










मधली पहिली कादंबरी अद्‌भुतरसपूर्ण आहे. यानंतरची प्रसिद्ध कृति म्हणजे ओय्यारत्तु चन्तु मेनवन् यांची ' इन्दुलेखा '. बेकन्सफील्डच्या ' हेनरीटा टेंपल ' वरून त्यांना स्फूर्ति मिळाली. या कादंबरींत ' मरिमेक्‍-ताई ' किंवा मातृसत्ताक कुटुंबव्यवस्थेचें फार वास्तव चित्र आहे. याच लेखकानें दुसरी कादंबरी ' शारदा ' लिहिली पण तो ती पूर्ण करूं शकला नाहीं. भारतीय वाङ्मयांत सुब्रह्मण्य भारती याची ' चंद्रिकै ' (तमिळ) हरि नारायण आपटे यांचें ' कालकूट ', प्रेमचंदांचें ' मंगलसूत्र ', ' प्रसाद ' यांची ' इरावती ' हीं अशींच अपूर्ण कादंबऱ्यांचीं नांवें होत.

ऐतिहासिक कादंबऱ्यांत दोन नांवें प्रामुख्यानें घेतलीं जातात : श्री. सी. वी. रामनपिल्लै यांची ' मार्तंडवर्मा '. ह्यांना केरळचे स्कॉट् म्हणतात. ' धर्म-राजा ', ' रामराजाबहादुर ' हे त्यांचे दोन आणखी ग्रंथ. दुसरें प्रसिद्ध नांव म्हणजे सरदार के. एम. पणिक्कर यांचें. ' कल्याणमल ', ' परंकि पटणाळी ', ' पुणीरकोटड-स्वरूपं ', ' धूमकेतुविन्टे उदयं ', ' केरळसिंह ' हे त्यांचे इतर ऐतिहासिक ग्रंथ होत. ' केरळसिंह 'चें भाषां-तर साहित्य अकादेमीतर्फे हिंदींत केलें जाईल.

### नाट्यवाङ्मय

मलयालम्‌मध्यें नाट्यसाहित्य इतकें समृद्ध नव्हतें. पण आतां त्याला खूपच बहर आला आहे. प्रथम नाटक सी. वी. रामनपिल्ले यांचें ' चंद्रमुखीविलासं ' होय. यानंतर केरलवर्मा तंपुरानचे ' अभिज्ञान-शाकुंतलं ', ' सुभद्राहरणं ', ' किरातार्जुनीयं ', ' रुक्मणीस्वयंवरं ' वगैरे संस्कृत ग्रंथांचे अनुवाद आहेत. मौलिक नाटकांत ' सदारामा ' हें फार काळपर्यंत लोकप्रिय होतें. त्याचे लेखक के. सी. केशवपिल्ले होत. वयाच्या पंधराव्या वर्षींच यांनीं प्रल्हादचरित, भद्रकथा लिहिली. नंतर ' केशवीयं ' महाकाव्य लिहिलें. यांचीं नाटकें नृत्यनाटकें होत.

' चक्की चंकरं ' हें आपल्या ' म्युनिसिपॅलिटी ' नाटका-प्रमाणें परिहासप्रधान प्रहसन आहे. याचे लेखक रामकुरुप्प मुनषी यांना ' दुष्टनाटकक्रतुमूषक ' अशी पदवीच मिळाली. पुढें बंगालींतून द्विजेन्द्रलाल रायच्या सर्व नाटकांचा अनुवाद मल्याळम्‌मध्यें झाला. कैणिक्कर कुमारपिळ्ळै व त्यांचे बंधु गोपाळपिळ्ळै यांनीं अनेक ग्रंथ निर्माण केले. ' कलवारियिल कल्पपादपं ' हें येशू खिस्ताच्या जीवनावरील नाटक फारच परिणामकारक वठलें आहे. याचाहि हिंदी अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर आहे. एम्. पी. चेलप्पन् नायर, गोपी-नाथन् नायर हे तीन चार नाटकांनीच केरळांतील शॉ म्हणून प्रसिद्ध झाले. टी. मोहम्मद व बशीर नांवाचे दोन नाटककार पुरोगामी जननाट्यपद्धतीचीं उत्तम नाटकें लिहीत आहेत. त्रिवेंद्रम् येथील साहित्यसम्मेलनांत डिसेंबर १९५४ मध्यें मी मोहम्मद यांचें ' एरि भूमियलु ' पाहिलें. त्याची स्तुति मास्ति वेंकटेश अय्यंगार यांनींहि केली.

---

## कुणासाठीं ?

कर्दळी पानांत  
मौक्तिक माळून  
झेंडूच्या फेट्याला  
गेलीय् भाळून !

गोऱ्या शेवंतीला  
लाज न उरली  
पारिजातकानें  
मूठ उधळली !

मोतिया कुलीन  
मोगरी शालीन  
मनांत हंसते  
बकुळ माळीण !

सायली नटली  
सायासावीण  
गुलाब फेंकितो  
मदनबाण !

बोगनवेलीच्या  
हिरव्या शेपटीं  
जास्वंदी रिबीन  
खुलते मोठी !

आणिक तिष्ठत  
उंच पायावर  
निशिगंध आहे  
कुण्या भागावर !

— राजा मंगळवेढेकर











आचार्य शं. द. जावडेकर

# धर्म आणि समाज-क्रांति

समाजक्रांतीला धर्माचें अधिष्ठान देणें इष्ट आहे किंवा नाहीं या प्रश्नाचा विचार या लेखांत करावयाचा आहे.

मानवसंस्कृतीला आधुनिक स्वरूप इ. स. च्या सतराव्या शतकापासून प्राप्त होऊं लागलें. हें आधुनिक स्वरूप देण्याचें कार्य युरोपखंडांत सुरू झालें. सतराव्या शतकांत युरोपांत निर्माण झालेली आधुनिक संस्कृति एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत सर्व जगभर पसरली. आणि तिनें युरोपाबाहेरील सर्व खंडांवर आपला प्रभाव आणि प्रभुत्व गाजविण्यास सुरवात केली. विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून आशियाखंडांतील राष्ट्रें आपल्यावरील युरोपियन राष्ट्रांचें राजकीय प्रभुत्व झुगारून देण्याचा प्रयत्न यशस्वी करूं लागलीं. त्याचबरोबर आधुनिक युरोपीय संस्कृतीवरहि त्यांनीं टीका करण्यास व हल्ले चढविण्यास सुरुवात केली. विसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास आज हीं आशियांतील राष्ट्रें युरोपियन सत्तांच्या आक्रमणांतून मुक्त होऊन आपापल्या राष्ट्रांचा संसार स्वतंत्रपणें थाटूं लागलीं आहेत. तुर्कस्थान-अरबस्थानापासून चीन, जपान, इंडोचायना व इंडोनेशिया येथपर्यंत पसरलेल्या सर्व आशियाई राष्ट्रांच्या पुढें आज जर कोणता महत्वाचा प्रश्न येऊन उभा राहिला असेल, तर तो म्हणजे आपल्या राष्ट्रांची सामाजिक पुनर्घटना कोणत्या तत्त्वांवर करावी हाच होय.

सतराव्या शतकापासून आतांपर्यंत युरोपीय राष्ट्रांनीं आशियाई राष्ट्रांवर जें सर्वांगीण आक्रमण केलें त्यामुळें या आशियाई राष्ट्रांमधील सर्व सामाजिक जीवन आणि पूर्वींच्या सर्व सामाजिक घटना उध्वस्त झाल्या आहेत. त्या पूर्वींच्या घटना व तें पूर्वींचें सामाजिक जीवन यांचा पुनरुद्धार करणें आज शक्य नाहीं. इतकेंच नाहीं तर त्यापूर्वींच्या स्वरूपांत त्यांचा पुनरुद्धार करणें इष्ट व योग्यहि नाहीं अशी जाणीव या आशियाई राष्ट्रांच्या नेत्यांना झालेली आहे. तरीहि मानवसंस्कृतीचे जें स्वरूप आधुनिक युरोपांत विकसित झालें त्या स्वरूपाची संस्कृति आपण स्वीकारावी हाहि विचार आज आशियांतील राष्ट्रांना योग्य वाटत नाहीं. युरोपीय लोक आशियाखंडावर आक्रमण करूं लागले त्याच्यापूर्वींची आपली समाजघटना पुनरुज्जीवित करणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं, तसेंच गेल्या तीन शतकांत आधुनिक युरोपांत निर्माण झालेली व आज जगभर फैलावलेली आधुनिक युरोपीय संस्कृतीहि अनुकरणीय व स्वीकरणीय नाहीं असे विचार बहुतेक आशियाई विचारवंतांना व राष्ट्रविधात्यांना आज पटलेले दिसतात. यामुळें भावी काळांत आशियांतील राष्ट्रांना एक नवीच संस्कृति निर्माण करावी लागेल ही भावना आशियांत आतां खोल रुजूं लागली आहे. मध्ययुगीन संस्कृतीचा पुनरुद्धार आणि युरोपीय संस्कृतीचें अनुकरण या दोनहि वृत्ती आपल्या कार्यास पुऱ्या पडणाऱ्या नसून मानवसंस्कृतीच्या नवनिर्मितीची वृत्ति व आकांक्षा आपण धारण केली पाहिजे, हा दृष्टिकोन स्वीकारून आम्ही स्वतंत्र प्रज्ञेनें आपला मार्ग आक्रमीत राहिलें पाहिजे, हा विचार आतां बहुमान्य झाला असून तो लवकरच सर्वमान्य होईल अशी खात्री वाटते. सांस्कृतिक नवनिर्मितीच्या या कार्यांत धर्मभावनेला कांहीं स्थान आहे किंवा नाहीं आणि मानवसंस्कृतीच्या भावी इतिहासांत धर्माचें भवितव्य काय होणार आहे या प्रश्नाचा थोडा विचार या लेखांत करावयाचा आहे.

पण हा विचारहि या विषयाच्या सर्व बाजूंनीं करावयाचा नसून सामाजिक क्रांतीच्या कार्यांत धर्मभावनेला कांहीं स्थान आहे किंवा नाहीं एवढ्या प्रश्नापुरताच या विषयाचा विचार मर्यादित करावयाचा आहे. आशिया-खंडांतील सामान्य जनतेच्या अंतःकरणांत अद्यापि धर्मभावना जागृत असून, निदान जिवंत असून, ती सामाजिक व्यवहारांवर इतकेंच नाहीं तर जनतेच्या राजकीय व्यवहारांवरहि बरा








अथवा वाईट प्रभाव गाजवूं शकते, ही गोष्ट आशियांतील गेल्या दोन-तीनशें वर्षांतील इतिहासाचें अवलोकन करणाऱ्यांस दिसून येते. आजहि जे आशियाई राष्ट्रविधाते आपल्या संस्कृतीच्या नवनिर्मितीचा विचार करीत आहेत त्यांच्यामध्येंहि सामाजिक क्रांति व धर्मभावना यासंबंधीं पूर्ण एकमत नाहीं. कांहींच्या मतानें धर्मभावना ही मूलतः व तत्त्वतःच क्रांतिविरोधी व प्रतिक्रांतिकारक असल्यामुळें तिचा सर्वस्वी त्याग आपण केला पाहिजे. इतर कांहींना असें वाटतें कीं, जरी धर्मभावना ही सर्वस्वीं त्याज्य नसली तरीहि ती कोणत्याहि सामाजिक व्यवहारांशीं निगडित होतां कामा नये, तिचा संपर्क कोणत्याहि व्यवहाराला होतां नये आणि तिचें अधिष्ठान सामाजिक घटना व मानवसंस्कृति यांना असावें ही वृत्ति तरी आपण त्याज्य समजली पाहिजे. कोणत्याहि सामाजिक व्यवहाराशीं निगडित न झालेली, कोणत्याहि व्यवहाराला आपला संपर्क न पोहचविणारी आणि संस्कृति व समाजघटना यांचें अधिष्ठान होण्याची आकांक्षा न बाळगणारी धर्मभावना मानवाच्या अंतःकरणांत जिवंत राहिली तर त्याला या लोकांचा विरोध नाहीं. तशाहि स्वरूपांत तिचें जिवंत राहणें त्यांना पसंत नसलें तरी तिचें प्राणहरण करण्याच्या कामांत आपल्या शक्तीचा व्यय करण्याइतकें त्याला महत्त्व नाहीं अशी त्यांची समजूत आहे. आपल्या व समाजाच्या उपेक्षेनें ही भावना अनायासें मरून जाईल अशी त्यांची खात्री आहे.

या दोनहि वर्गांहून भिन्न असा आशियांतील राष्ट्रविधात्यांमध्यें आणखी एक वर्ग आहे. त्याचें असें मत आहे कीं धर्मभावना ही केवळ प्रतिक्रांतिकारक भावना नसून ती क्रांतिकारक व पुरोगामी अशीहि बनूं शकते. आज आशियाला व एकंदर मानवसंस्कृतीला जें क्रांतिकार्य करावयाचें आहे त्या क्रांतिकार्याला शुद्ध धर्मभावनेचा उपयोग होईल इतकेंच नव्हे तर त्या क्रांतिकार्याचें अधिष्ठानहि ही शुद्ध धर्मभावना होऊं शकेल. मानव-संस्कृतींत जी क्रांति अभिप्रेत आहे व इष्ट आहे ती या शुद्ध धर्मभावनेच्या अधिष्ठानावर घडवून आणण्यानेंच तें क्रांतिकार्य खऱ्या अर्थानें सफल होणार आहे. राजकारण असो, समाजकारण असो किंवा अर्थकारण असो, यासंबंधींच्या सर्व मानवी व्यवहारांचें अधिष्ठान खऱ्या व उच्च अर्थानें धर्मभावना हेंच असलें पाहिजे असें या लोकांचें मत असून या धर्मभावनेच्या अधिष्ठानावर सामाजिक, राजकीय व आर्थिक क्रांति करण्याचे प्रयत्न आशियांतील हे क्रांतिकारकवृत्तीचे धर्मनिष्ठ लोक करीत आहेत. अशा लोकांत म० **गांधी** हे एक सर्वश्रेष्ठ लोकनायक होऊन गेले असून त्यांनीं भारतांत निर्माण केलेली सत्याग्रही क्रांतिशक्ति आज सामाजिक व आर्थिक क्रांतीचें कार्य करूं लागली आहे. हें सत्याग्रही क्रांतिशास्त्र हा आधुनिक मानवाला दिलेला एक नवा मानवधर्म असून या मानवधर्माचें मूळ मानवी अंतःकरणांतील धर्मभावना व अध्यात्मवृत्ति यांत आहे. अर्थात् या आध्यात्मिक मानवधर्माचे जे उपासक आहेत, त्यांना धर्म ही केवळ प्रतिक्रांतिकारक भावना आहे आणि अध्यात्म हा केवळ पलायनवाद आहे हे विचार मुळींच पटत नाहींत. तसेंच, ही धर्मभावना व अध्यात्मवृत्ति यांचा संपर्क सामाजिक व्यवहारांशीं असूं नये अथवा त्यांना मानवाच्या केवळ अंतरंगांतच कोंडून ठेवावें हें मतहि या लोकांना पसंत नाहीं. याच्या उलट, धर्मभावना व अध्यात्मवृत्ति यांचा प्रभाव मानवाच्या सर्व व्यवहारांवर पडावा व त्यांचें अधिष्ठान सामाजिक घटनेच्या सर्व अंगांस लाभावें असें त्यांचें निःसंदिग्ध मत आहे.

## समाजाला अधिष्ठानभूत धर्मभावना

समाजघटनेच्या सर्व अंगांना अधिष्ठानभूत आणि समाजांतील सर्व व्यवहारांवर आपला प्रभाव गाजविणारी धर्मभावना कोणती याचें स्पष्टीकरण जर केलें नाहीं तर मोठाच घोटाळा होण्याचा संभव आहे. हा घोटाळा टाळण्याच्या हेतूनें म० **गांधींनीं** समाजाला अधिष्ठानभूत असणाऱ्या धर्मभावनेचें स्वरूप पुढीलप्रमाणें विशद केलें आहे :

" Yes, I shall hold that I cannot conceive politics as divorced from religion. Indeed, religion should pervade everyone of our actions. Here religion does not mean sectarianism. It means a belief in ordered moral government of the Universe. It is not less real because it is unseen. This religion







transcends Hinduism, Islam, Christianity etc. It does not supersede them. It harmonizes them and gives them reality. '

— 'Harijan', 10-2-40

वरील उताऱ्यांत मानवाच्या सर्व व्यवहारांना अधिष्ठानभूत असणारी अशी सर्वव्यापक धर्मभावना म्हणजे हिन्दू, मुसलमान, खिस्ती, बौद्ध इत्यादि कोणताहि विशिष्ट सांप्रदायिक धर्म नव्हे तर या सर्व सांप्रदायिक धर्मांना व्यापून असणारी आणि त्या सर्वांचा समन्वय व संगति घडवून आणणारी सर्वव्यापी धर्मभावना होय असें स्पष्टीकरण गांधीजींनीं केलेलें आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं या सर्वश्रेष्ठ मानव-धर्माचें वर्णन करीत असतांना ते म्हणतात : " Let me explain what I mean by religion. It is not the Hindu religion which I certainly prize above all other religions, but the religion which transcends Hinduism, which changes one's very nature, which binds one indissolubly to the truth within and which ever purifies. It is the permanent element in human nature which counts no cost too great in order to find expression and which leaves the soul utterly restless until it has found itself, known its Maker and appreciated the true correspondence between Maker and itself. "

—'Young India', 1921

या उताऱ्यांत गांधीजींनीं या सर्वश्रेष्ठ धर्मभावनेचें थोडक्यांत वर्णन केलेलें आहे. ही धर्मभावना मानवी अंतःकरणांतील एक सनातन वृत्ति असून तिची व्याप्ति हिंदुधर्माहून किंवा इतर कोणत्याहि विशिष्ट धर्माहून अधिक असून तिच्यामुळें आपल्या स्वभावांतच क्रांति घडून येते, आपल्या अंतरंगांतील सत्याशीं आपण निगडित होतों आणि तिच्यामुळें आपली सतत शुद्धि घडत असते. ही वृत्ति जागृत झाली असतां ती प्रकट करण्यासाठीं कोणतेंहि मोल द्यावें लागलें तरी तें आपणांस अधिक वाटत नाहीं आणि तिच्यामुळें आपणांस आत्मप्राप्ति होईपर्यंत अथवा अंतरात्म्याचें दर्शन होऊन त्याचा आपला संबंध उलगडला जाईपर्यंत आपल्या मनांस शांति लाभत नाहीं.– अशी ही सर्व मानवांच्या अंतर्यामीं असणारी चित्–शक्ति व तिच्याशीं तादात्म्य पावण्याची मानवी अंतःकरणांतील दुर्दम्य आकांक्षा हीच धर्मभावना होय. याच अधिष्ठानावर सर्व धर्मांची उभारणी झालेली असून नीतिशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांचा तो सनातन आधार आहे. या सनातन आधाराच्या अधिष्ठानावर व या सर्वव्यापक सर्वश्रेष्ठ धर्मभावनेला आपल्या जीवनांत मूर्त स्वरूप देण्यासाठींच आपण राजकीय व सामाजिक क्रांतीचें कार्य करीत असून त्यांतूनच नवी सर्वोदयकारी समाजघटना व मानवसंस्कृति यांची निर्मिति होणार आहे, अशी म० गांधींची निष्ठा होती. त्यांच्या या निष्ठेस सत्याग्रही सर्वोदयवाद असें नांव प्राप्त झालें आहे. या विचाराच्या लोकांची धर्मभावना क्रांतिकारक असून त्यांची क्रांतिकारकता धर्मप्रेरित व अध्यात्मनिष्ठ आहे. त्यांचें असेंहि म्हणणें आहे कीं आधुनिक युरोपनें जी क्रांतिकारक वृत्ति निर्माण केली ती करीत असतां धर्मभावना व अध्यात्मप्रेरणा यांना दूर लोटून ती निर्माण केली असल्यामुळें तिला आज सर्वसंहारक स्वरूप प्राप्त होत आहे. या बाबतींत आशियाखंडानें युरोपचें अंधानुकरण न करतां अध्यात्मप्रेरित धर्मभावनेच्या अधिष्ठानावर मानवसंस्कृतींत आज अपरिहार्य असलेली सर्वांगीण क्रांति घडवून आणिली पाहिजे.

सत्याग्रही सर्वोदयवादाच्या दृष्टीनें मानवी अंतःकरणांतील आत्मप्रेरणा म्हणजे विश्वांतील अंतिम सत्याच्या संशोधनाचीच प्रेरणा होय. असत्यांतून सत्याकडे, असतांतून सताकडे आणि भ्रमांतून ब्रह्माकडे जाण्याची मानवी बुद्धीची जी वृत्ति तीच आत्मप्रेरणा होय असेंहि म्हणतां येईल. या आत्मप्रेरणेचें पर्यवसान विश्वाशीं तादात्म्य पावणें हेंच असल्यामुळें विश्वांतील सत्याच्या संशोधनाबरोबरच विश्वावर प्रेम करणारी सर्वात्मभावना तिच्यांत अंतर्भूत होत असते. अव्यभिचारी सत्यनिष्ठा आणि निर्विकार, निरहंकार व






निर्मम असें विश्वप्रेम या दोहोंच्याप्रमाणेंच आपले सर्व जीवनव्यापार विश्वाला समर्पण करण्याची समर्पण-वृत्तीहि या आत्मप्रेरणेंत अंतर्भूत होत असते. सत्यनिष्ठ बुद्धि, प्रेममय अंतःकरण आणि तपःपूत इंद्रियव्यापार हा जीवनाचा आदर्श आपल्यापुढें ठेवून त्याचा साक्षात्कार घडवून आणणें हेंच जीवनाचें अंतिम साध्य होय. अशी ही सत्याग्रही सर्वोदयवादी जीवननिष्ठा आहे. हींत मानवी अंतःकरणांतील सनातन आत्म-प्रेरणा व धर्मभावना यांचा समन्वय झालेला असून या रूपानें सनातन मानवधर्म आज प्रकट होत आहे. या सनातन मानवधर्माच्या संस्थापनेसाठींच आजच्या मानवसंस्कृतींत सर्वांगीण क्रांति घडून आली पाहिजे व ही सर्वांगीण क्रांति धर्मभावना व आत्मप्रेरणा यांच्याच अधिष्ठानावर घडली पाहिजे. ही सर्वांगीण क्रांति केवळ सामाजिक, आर्थिक व राजकीय इत्यादि समाजाच्या बाह्यांगांतच घडून यावयाची नसून ती त्यांच्या अतरंगांतहि म्हणजे धर्मविचारांत, धर्माचारांत व आत्मविचारांतहि घडून येणार आहे. मानवी जीव-नांत व समाजांत सर्वांगीण क्रांति घडवून आणूं पाह-णारा मार्क्सवाद किंवा क्रांतिकारक समाजवाद आणि आणि गांधीवाद किंवा सत्याग्रही सर्वोदयवाद अशीं हीं दोन जीवनदर्शनें असून त्यांपैकीं पहिलें हें धर्मभाव-नेला व आत्मप्रेरणेला मारक तर दुसरें हें त्यांना तारक व उद्धारक आहे. आशियांतील राष्ट्रविधात्यांनीं पहिल्या क्रांतिकारक जीवनदर्शनाचा अवलंब न करतां दुसऱ्या जीवनदर्शनाचा अवलंब करावा असा प्रयत्न भारतीय राष्ट्रनेते करीत आहेत. पण धर्मभावना व आत्मप्रेरणा यांना क्रांतिकारक स्वरूप कधींहि प्राप्त होणार नाहीं असा आग्रह धरणारे लोक या विचाराला आधुनिकतेच्या नांवानें व बुद्धिनिष्ठ मानवतावादाच्या नांवानें विरोध करीत आहेत. या विरोधाचें स्वरूप समजून घेऊन त्याचें निराकरण केलें पाहिजे.

## आधुनिक युरोप आणि आधुनिक आशिया

वरील प्रश्नाचा विचार करीत असतां सुमारें तीनशें वर्षांच्या काळांत आशियांतील राष्ट्रविधात्यांच्या अंतः-करणांत एक वैचारिक क्रांति घडून आलेली आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. अठराव्या शतकाच्या अखे-रीस आणि एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं ब्रिटिशांनीं सर्व भारत आपल्या पायाखालीं घातला आणि ब्रिटिश व इतर युरोपीय राष्ट्रांनीं आशियांतील इतर राष्ट्रांवरहि औद्योगिक व राजकीय आक्रमण करण्यास प्रारंभ केला. या घडामोडींमुळें आशिया-खंडांतील विचारवंतांचे डोळे उघडले आणि त्यांनीं आपल्या संस्कृतीच्या सुधारणेस प्रारंभ केला. आशियांतील संस्कृतीच्या सुधारणेचा हा प्रारंभ म्हणजे आधुनिक आशियाचा जन्मच होय. आपल्या संस्कृतींत आधुनिक कालास अनुरूप अशी सुधारणा घडून आली पाहिजे अशी जाणीव होणाऱ्या राष्ट्रपुरुषांत भारतांतील **राजा राममोहन रॉय** हे पहिले होत. त्यांच्या काळांत युरोप-खंडांत फ्रेंच राज्यक्रांतीचा स्फोट होऊन त्यांतून निर्माण झालेल्या युरोपीय महायुद्धाच्या ज्वाला सर्व युरोपखंडांत पसरून मध्ययुगीन युरोपची राखरांगोळी झाली. फ्रान्स देशांत नेपोलियनचा उदय होऊन कांहीं काळ त्यानें सर्व युरोपखंड पादाक्रांत करून ब्रिटिशांना नामशेष करण्याचा प्रयत्न केला. पण हा प्रयत्न अयशस्वी होऊन नेपोलियनचाच अखेरीस पाडाव झाला. याच सुमारास ब्रिटिशांनीं भारतांतील मराठ्यांचें साम्राज्य धुळीस मिळविलें. यानंतर सुमारें पन्नास-साठ वर्षें तरी आधुनिक युरोपचें सर्व नेतृत्व ब्रिटनकडे येऊन ब्रिटिश राष्ट्र जगांतील अत्यंत पुढारलेलें व सुसंस्कृत राष्ट्र होय अशी जगाची व अशियांतील लोकांची खात्री झाली. या काळांत ब्रिटनमध्यें प्रागतिक व्यक्तिवाद या नांवाचें एक सामाजिक तत्त्वज्ञान उदयास येऊन प्रतिष्ठा पावलें. या प्रागतिक व्यक्तिवादास भारतीय वेदान्ताचा आधार देऊन भारतांतील सुधारणावादाचा झेंडा राजा राममोहन रॉय यांनीं उभारिला. त्यांनीं भारताला आधुनिक काळांत विश्वात्मक मानवधर्माची दृष्टि प्रथम आणून दिली. तसेंच, भारताच्या प्राचीन वेदान्तांत या विश्वात्मक मानवधर्माचीं बीजें असून त्यांतील तत्त्वें साकार व्हावयाचीं तर भारतीयांनीं आपल्या धार्मिक, सामाजिक, राजकीय इत्यादि सर्वांगीण जीवनांत व विचारांत क्रान्ति घडवून आणिली पाहिजे अथवा सुधारणा केली पाहिजे याचीहि जाणीव त्यांनींच प्रथमतः करून दिली. या सर्वांगीण सुधारकवृत्तीबरोबरच त्यांच्या अंतःकरणांत भारतीय राष्ट्रासंबंधींचा अभिमान व राष्ट्रीय वृत्तीहि वसत होती. त्यांनीं स्थापन केलेल्या ब्रह्मसमाजांत या दोन वृत्तींचा योग्य समन्वय न होतां, एका बाजूस विश्वात्मक मानव-








धर्म व दुसऱ्या बाजूस भारतीय राष्ट्रीयवृत्ति यांच्या दरम्यान संघर्ष उत्पन्न होऊन ब्रह्मसमाजाची शकलें उडालीं. बंगालमधील ब्रह्मसमाजाचें अनुकरण करून व त्यांचा प्रागतिक व्यक्तिवाद आधारास घेऊन महाराष्ट्रांत प्रार्थनासमाज व सुधारक पंथ निर्माण झाले. या प्रागतिक सुधारणावादाचे महाराष्ट्रांतील नेमस्त पुढारी न्या. रानडे असून, आगरकर हें त्याच प्रागतिक व्यक्तिवादाचे जहाल पुरस्कर्ते होत. अशा रीतीनें एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या काळांत भारतांत प्रागतिक व्यक्तिवादाच्या तत्त्वानुसार एक वैचारिक परिवर्तन घडून आलें. हें वैचारिक परिवर्तन जरी सामान्य जनतेला हलवून जागें करूं शकलें नाहीं तरी बहुतेक सर्व सुशिक्षित वर्गावर त्याचे परिणाम घडून आले आणि भारतीय विचारवंतांचा दृष्टिकोण मध्ययुगांतून आधुनिक युगांत प्रविष्ट झाला.

इतकें वैचारिक परिवर्तन घडून येतें, तोंच एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्र व बंगाल या दोनहि प्रांतांत एक आध्यात्मिक राष्ट्रवाद असें ज्याला म्हणतां येईल असें दुसरें सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण झालें. या तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते **लोकमान्य टिळक** व **स्वामी विवेकानंद** असून त्यांनीं भारताला व्यक्तिवादांतून राष्ट्रवादांत नेलें आणि भारतीय अथवा पौरस्त्य संस्कृति ही आध्यात्मिक असून ती आधुनिक युरोपांत निर्माण झालेल्या भौतिक संस्कृतीपेक्षां श्रेष्ठ आहे असा अभिमान निर्माण केला. त्याप्रमाणें, आपल्या प्राचीन संस्कृतींत अनेक सुधारणा घडून आल्या पाहिजेत हें खरें असलें तरी तिची मूळ प्रकृति निकोप असल्यामुळें तिच्यावरील परकीय आक्रमणाचा अंत करणें हेंच आपलें आजचें आद्य कर्तव्य आहे अशी नवी दृष्टि भारतीय सुशिक्षित वर्गाला आणून दिली. प्रागतिक सुधारणावाद हा व्यक्तिवादी असल्यामुळें व त्याची प्रवृत्ति भौतिकसुखवादी असल्यामुळें त्याला त्यांनीं हीन ठरविलें. तसेंच अध्यात्मप्रेरणा व धर्मभावना यांचा प्रभाव समाजाच्या सर्व व्यवहारांवर पडला पाहिजे हेंच योग्य आहे असा आग्रह धरून त्यांनीं आपल्या राष्ट्रवादाला अध्यात्माचें व धर्माचें अधिष्ठान देण्याचा प्रयत्न केला. या आध्यात्मिक राष्ट्रवादी प्रयत्नाचे कांहीं दुष्परिणाम झालेले दिसतात. ते दुष्परिणाम म्हणजे राष्ट्राभिमानाला धर्माचें अधिष्ठान दिल्यामुळें सर्व भारतीयांचा राष्ट्रवाद एकच न बनतां हिंदू राष्ट्रवाद व मुस्लिम राष्ट्रवाद असे भारतीय राष्ट्रवादाचे दोन भेद निर्माण झाले. तसेंच सामाजिक व धार्मिक सुधारणांना गौणत्व प्राप्त होऊन त्या सुधारणांचें कार्य स्थगित झालें व सुधारक वर्ग हा जनतेच्या निंदेचा व अवहेलनेचा विषय बनला. तथापि या आध्यात्मिक राष्ट्रवादाला अधिकाधिक तेज चढत जाऊन त्याला परकीय सत्तेविरुद्ध क्रांतिकारक स्वरूप प्राप्त झालें. भारतीय राष्ट्रवादाची हीच वैचारिक दृष्टि सामान्यतः १९२० सालपर्यंत टिकून होती.

१९२० सालापासून भारतीय राष्ट्रवादाचें नेतृत्व **म. गांधींच्याकडे** आलें आणि त्यांनीं आध्यात्मिक राष्ट्रवादांत शिरलेले वर दाखवून दिलेले दोनहि दोष काढून टाकून त्याला सत्याग्रही सर्वोदयवादाचें स्वरूप दिलें. या सत्याग्रही सर्वोदयवादांत आत्मप्रेरणेचें व धर्मभावनेचें अधिष्ठान कायम ठेवलेलें असलें तरी त्याचा आधार हिंदुराष्ट्रवाद किंवा मुस्लिमराष्ट्रवाद यांचा पुरस्कार करणाऱ्या संकुचित धर्मनिष्ठांना घेतां येत नाहीं. तसेंच सत्याग्रही सर्वोदयवाद हा केवळ परकीय सत्तेविरुद्ध क्रांति करणारा राजकीय क्रांतिवाद नसून तो धर्म व अध्यात्म यांसहित समाजाच्या सर्व अंगांत क्रांति घडवून आणणारा सर्वांगीण क्रांतिवाद आहे. शिवाय हा जसा संकुचित, सांप्रदायिक धर्मांच्या मर्यादा उल्लंघून जाणारा आहे तसाच तो राष्ट्रभेदांचें व मर्यादांचें उल्लंघन करून मानवतेसंबंधींचीं कर्तव्यें अव्यभिचारी निष्ठेनें पार पाडणारा आहे. किंबहुना या सर्वोदयवादांत व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद या सर्वांचा समन्वय साधून त्यांना आध्यात्मिक व व्यापक मानवधर्माचें अधिष्ठान देण्यांत आलेलें आहे. यामुळें इतर धर्मनिष्ठ राष्ट्रवाद्यांच्या वर येणारे आक्षेप गांधीजींनीं पुरस्कारिलेल्या राष्ट्रवादावर येऊं शकत नाहींत. राष्ट्रीयत्व, धर्मनिष्ठा व अध्यात्मवृत्ति या सर्व गोष्टी केवळ प्रतिगामी आहेत असा दुराग्रह ज्यांच्या बुद्धीला जडलेला आहे त्यांनाच तसा भास होत असतो. पण हा शुद्ध बुद्धिवाद नसून तो एक पूर्वग्रहदूषित युक्तिवाद आहे. आधुनिक भारताच्या वैचारिक क्रांतीला असें सर्वोदयवादी स्वरूप आलेलें असून आज भूदान-आंदोलनाच्या रूपानें या वैचारिक क्रांतींतून समाजवादी क्रांति घडून येत आहे.







ही समाजवादी क्रांति अहिंसेनें घडून यावी व येऊं शकेल अशी निष्ठा भारतीय जनतेंत व भारतीय नेत्यांत निर्माण झाली आहे.

राजा राममोहन रॉय यांच्या काळापासून गांधी व विनोबा यांच्या काळापर्यंत भारतीयांच्या अंतःकरणांत धार्मिक व सामाजिक विचारांत जी क्रांति घडून आलेली आहे, तिचें थोडक्यांत पर्यालोचन येथें केलें आहे. त्यावरून असें दिसून येईल कीं आधुनिक युरोपांत निर्माण झालेले व्यक्तिवादी, राष्ट्रवादी व समाजवादी असे सामाजिक तत्त्वज्ञानाचे तीनहि संप्रदाय भारतीय संस्कृतीनें आत्मसात् केले असून ती आतां आपल्या राष्ट्रांत सत्याग्रही मार्गानें लोकशाही समाजवादाची संस्थापना करण्यांत निमग्न झाली आहे. ही सर्व वैचारिक क्रांति घडून येत असतांना भारतीयांनीं अध्यात्माचें व धर्माचें अधिष्ठान उखडून काढिलें नाहीं तर आपले आध्यात्मिक व धार्मिक विचार व भावना यांत क्रांति घडवून आणून त्या अधिष्ठानालाच त्यांनीं आपल्या सामाजिक सर्वांगीण क्रांतीची तरफ बनविली आहे. सत्याग्रही सर्वोदयवाद हा एक मानवाचा नवा क्रांतिकारक जीवनदृष्टिकोन बनला असून मार्क्सच्या भौतिकवादी जीवनदृष्टिकोनापेक्षां तो अधिक मूलगामी व अधिक शुद्ध आहे. या नव्या क्रांतिकारक दृष्टिकोनामुळेंच भारतांत मार्क्सवादाला स्थान उरलेलें नसून भारतीय समाजवाद सत्याग्रही व सर्वोदयवादी बनूं लागला आहे. अर्थात् या क्रांतिकारक दृष्टिकोनामुळेंच भारतीयांच्या परंपरागत धर्मविचारांत व धर्मभावनांत क्रांति घडून येत आहे व येणार आहे यांतहि शंका नाहीं. धर्मभावना व अध्यात्मविचार यांत केवढीहि क्रांति सत्याग्रही सर्वोदयवादानें घडवून आणिली असली तरी सामाजिक क्रांतीचें व सामाजिक घटनांचें व व्यवहारांचें अधिष्ठान आध्यात्मिक असलें पाहिजे व विश्वव्यापक मानवधर्माची वृत्ति प्रत्येक मानवी व्यक्तीच्या अंतःकरणांत तेवत राहिली पाहिजे ही प्राचीन काळापासून चालत आलेली निष्ठा भारतीयांनीं सोडून दिलेली नसून ती अधिकच दृढ बनली आहे. इतकें असूनहि त्यांनीं आपल्या राष्ट्रांत जी राज्यघटना उभारिली आहे ती कोणत्याहि विशिष्ट सांप्रदायिक धर्माला पक्षपाती होऊं नये अशी पूर्ण दक्षता त्यांनीं घेतली आहे. ती कोणत्याहि धर्माला मारक नसून तारकच आहे. पण तिला कोणत्याहि विशिष्ट धर्मासंबंधीं ममत्व वाटत नसून कोणत्याहि विशिष्ट धर्माचा अहंकार तिला पछाडूं शकणार नाहीं अशीहि दक्षता भारतांतील सर्वपक्षीय नेते घेत आहेत. त्याचप्रमाणें या राष्ट्रांतील सामाजिक क्रांतीचें कार्य सत्याग्रही निष्ठेनें चालूं असलें तरी या क्रांतिकार्यालाहि विशिष्टसंकुचित धर्मभावनेचा अहंकार व विशिष्टधर्मीयासंबंधीचें ममत्व या दोषांनीं पछाडूं नये याबद्दलहि पूर्ण दक्षता घेण्यांत येत आहे. यामुळें आध्यात्मिक व धार्मिक अधिष्ठानावर चालणाऱ्या क्रांतिकारक आंदोलनांतून धर्मवेड पसरेल व निरनिराळ्या धर्मांतील लोक एकमेकांशीं झगडूं लागतील ही भीति निराधार ठरत आहे. तात्पर्य, मानवी अंतःकरणांतील अध्यात्मप्रेरणा व धर्मभावना यांना जागृत व प्रभावी बनवून समाजांत सर्वांगीण क्रांति कशी घडवून आणावी याचें एक नवें तंत्र अथवा शास्त्र आधुनिक भारतांत निर्माण झालें आहे. यापासून सर्व आशिया खंडाला बोध घेतां येण्यासारखा आहे व तसा तो बोध आशियांतील इतर राष्ट्रांचे नेते घेऊंहि लागले आहेत.

### क्रांतिकारकांचे धर्मावरील आक्षेप

युरोपीय क्रांतिकारकांनीं धर्मावर जे आक्षेप घेतले आहेत व ज्या आक्षेपांमुळें धर्मभावना केव्हांहि क्रांतिकारक बनणार नाहीं असें ते प्रतिपादितात त्या आक्षेपांचा आतां थोडक्यांत विचार करूं. धर्मभावनेवर पहिला आक्षेप असा आहे कीं ही भावना मनुष्याला शब्दप्रामाण्यवादी बनविते आणि त्यामुळें जनता बुद्धिप्रामाण्याला झुगारून देऊन आंधळेपणानें विशिष्ट विभूतींचें किंवा ग्रंथांचें बौद्धिक दास्य स्वीकारिते. धर्मभावना व धर्मविचार यांचा आधुनिक दृष्टीनें विचार करणाऱ्यांनीं आतां या क्षेत्रांतूनहि शब्दप्रामाण्याचें व ग्रंथप्रामाण्याचें तत्त्व झुगारून दिलें आहे. बुद्धिप्रामाण्याच्या तत्त्वाविरूद्ध त्यांचा आक्षेप नसून जी बुद्धि विकार, वासना, अहंकार व ममत्व यांच्यापासून अलिप्त बनलेली नाहीं व जिला साम्यावस्था प्राप्त झालेली नाहीं तिला प्रमाण न मानतां निरहंकार व निर्मम अशा निर्विकार बुद्धीला प्रमाण माना एवढाच त्यांचा आग्रह आहे. धर्मनिष्ठ व अध्यात्मवादी यांनीं अहंकारी, ममत्वयुक्त व सकाम








बुद्धीवर जे आक्षेप घेतलेले आहेत ते बरोबर असून त्यांचा स्वीकार करून बुद्धिवादाची पुनः नवी मांडणी केली पाहिजे असें आम्हांस वाटतें. तथापि अशी नवी मांडणी केली तरी कोणाहि सुबुद्ध मनुष्यानें दुसऱ्या व्यक्तीचें अथवा ग्रंथाचें बौद्धिक दास्य स्वीकारितां कामा नये व आपल्या बुद्धीस शुद्ध करून आपल्या अंतःकरणप्रवृत्ती बुद्धीनें सुसंगत व सत्प्रवृत्त बनविल्या पाहिजेत हें तत्त्व धर्माला क्रांतिकारक स्वरूप देणाऱ्यांनीं मान्य केलें पाहिजे व तसें मान्य केलेंहि आहे. विशेषतः **म० गांधी व आचार्य विनोबा** यांच्यासारखे धर्मनिष्ठ क्रांतिकारक जनतेला बुद्धिप्रामाण्याचा व आत्मप्रामाण्याचाच उपदेश करीत असतात व आपलें बौद्धिक दास्य कोणीहि स्वीकारूं नये असें स्पष्ट बजावीत असतात. यावरून धर्मनिष्ठा व बौद्धिक दास्य यांचा अविच्छेद्य संबंध आहे हें मत निराधार ठरतें. गांधीजी किंवा विनोबा यांच्यासारखे क्रांतिकारक नेते बौद्धिक दास्याचा निषेध करीत असतांना सुद्धां गांधीवादी म्हणविणारे बहुसंख्य लोक त्यांचें शब्दप्रामाण्य मानून चालतात असें म्हणणाऱ्यांना एवढेंच उत्तर पुरें आहे कीं हा देखावा केवळ धर्मनिष्ठ क्रांतिकारकांच्या बाबतींत दिसतो असें नाहीं, तर धर्मविरोधी क्रांति करणाऱ्या भौतिकवादी कम्युनिस्ट पक्षांतील असामान्य नेत्यांचेंहि शब्दप्रामाण्य मानणारे लोक त्या पक्षांत बहुसंख्य असतात. याचा दोष त्या तत्त्वज्ञानाला लावण्याचें कारण नाहीं. बुद्धिस्वातंत्र्याचें तत्त्व धर्मानें मान्य केलेलें नाहीं हें मत सर्वस्वी खरें नसून भौतिकवाद्यांपेक्षां अध्यात्मवाद्यांनीं व धर्मनिष्ठांनीं बुद्धिस्वातंत्र्याचा अधिक खोलवर विचार केला आहे व बुद्धीला दास बनविणाऱ्या अहंकार-ममत्वादि अंतर्गत शत्रूंना नष्ट करण्याचें महत्त्व भौतिकवाद्यांहून अधिक ओळखिलें आहे असेंच म्हणावें लागेल. तात्पर्य, धर्मभावना व बुद्धिस्वातंत्र्य यांचा विरोध नित्याचा नसून सत्याग्रही क्रांतिशास्त्रांत धर्मभावना व बुद्धिस्वातंत्र्य यांचा योग्य समन्वय झाला आहे. भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत असा समन्वय वेदान्त, बौद्ध व जैन दर्शनांत प्राचीन काळींहि झालेला आढळतो. धर्म हा अनुभवाचा विषय आहे व या विषयांत आत्मप्रतीति ही गुरुप्रतीति व शास्त्रप्रतीति यांहून श्रेष्ठ आहे अशा रूपानें हा समन्वय प्राचीन काळीं केलेला आढळतो.

बुद्धिस्वातंत्र्याप्रमाणेंच व्यक्तिस्वातंत्र्याला व सामाजिक समतेला धर्माचा विरोध आहे असा धर्मभावनेवर दुसरा आक्षेप आहे. प्राचीन व मध्ययुगीन समाजरचना सामाजिक विषमतेवर उभारलेल्या होत्या व अशा विषमतायुक्त समाजरचनांना तत्कालीन धर्मांनीं मान्यता दिलेली होती ही गोष्ट खोटी नाहीं. पण सामाजिक विषमतेच्या तत्त्वाला समाजरचनेच्या बाबतींत मान्यता देण्याचें वास्तववादी कारण मनुष्यांच्या सकाम बुद्धींत आहे. सकाम बुद्धीच्या बहुसंख्य लोकांना उत्पादनकार्य करण्यास प्रवृत्त करण्यासाठीं संपत्तीची व सामाजिक प्रतिष्ठेची विषम विभागणी करावी लागते व ही गरज जेव्हां उत्पादनाचीं साधनें अविकसित असतात तेव्हां अधिक प्रमाणांत उत्पन्न होते हें समाजशास्त्राचें तत्त्व येथें लक्षांत घेतलें पाहिजे. धर्म हा समाजधारणेचा विचार करूं लागला व समाजरचना बनवूं लागला म्हणजे त्यालाहि वास्तववादी दृष्टि स्वीकारून सामाजिक विषमतेला मान्यता द्यावी लागते एवढाच याचा अर्थ आहे. पण उत्पादनसाधनें अविकसित असतांना सुद्धां वास्तवव्यवहारांत विषमतेला अशी मान्यता दिली असली तरी निष्काम धर्माचरण हें जे धर्माचें दुसरें व शुद्ध अंग त्या अंगांत स्वातंत्र्य, समत्व आणि बंधुत्व हीं तत्त्वें धर्मानें जिवंत ठेविलेलीं होतीं. आणि त्या तत्त्वांच्या संरक्षणासाठीं अनेक धर्मनिष्ठांनीं पूर्ण निष्काम बनून संन्यास-दीक्षा घेतलेली होती हा इतिहास डोळ्याआड करून धर्मभावनेचें विवेचन करतां येणार नाहीं. प्राचीन युगांतील संन्याशांनीं व मध्ययुगांतील साधुसंतांनीं स्वातंत्र्य, समत्व आणि बंधुत्व हीं तत्त्वें जिवंत ठेवण्यासाठीं आपल्या वैयक्तिक संसारांचा होम केला होता हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तसेंच, युरोपखंडांत लोकशाही आणि समाजवाद यां सामाजिक ध्येयांत अंतर्भूत होणारीं तत्त्वें व त्या तत्त्वांच्या संस्थापनेसाठीं करावी लागणारी क्रांति प्रथमतः धर्मनिष्ठांनींच पुरस्कारिलेलीं आहे असा भरपूर पुरावा युरोपीय इतिहासांत आढळतो. सर्व जमीन व सर्व संपत्ति यांच्यावर परमेश्वराचें स्वामित्व आहे असा प्रचार ब्रिटनमध्यें तेराव्या-चौदाव्या शतकांत होऊन गेलेल्या लोलर्ड नांवाच्या धर्मानुयायांनीं केला. सोळाव्या शतकांत सर टॉमस मोअर या धर्मनिष्ठानें लिहिलेल्या



अनुक्रमणिका

'युटोपिया' नांवाच्या ग्रंथांत संपत्तीवर सामाजिक स्वामित्व स्थापन झाल्यावांचून समाजांत शांति व स्वास्थ्य नांदणार नाहीं, असें प्रतिपादन केलेलें आहे. पुढें सतराव्या शतकांत इंग्लंडांत जी प्युरिटन क्रांति झाली ती धर्मप्रेरित होती याबद्दल कोणासहि शंका नाहीं. इतकेंच नाहीं तर मार्क्सवादी क्रांतिशास्त्रांत शासनमुक्त समाजाची जी अंतिम अवस्था वर्णिलेली आढळते तिचा उगम ख्रिस्ताच्या धर्मोपदेशांतच आहे हेंहि तितकेंच निःसंदिग्ध आहे. तात्पर्य, आधुनिक युरोपांत ज्या ब्रिटिश, फ्रेंच व रशियन क्रांत्या झाल्या त्यांच्या बुडाशीं जीं जीवनमूल्यें होतीं व ज्या जीवनमूल्यांच्या आविष्कारासाठी लक्षावधी क्रांतिकारकांनीं आपल्या सर्वस्वाचें बलिदान केलें तीं जीवनमूल्यें धर्मनिष्ठांनीं प्राचीन कालापासून आतांपर्यंत जतन करून ठेविलेलीं आहेत. या सनातन ठेव्यासाठींच समाजांत क्रांति करावयाची असते. हें ओळखूनच म. गांधींनीं सत्याग्रही वृत्तीनें भारतांत सर्वांगीण क्रांति घडवून आणण्याची दीक्षा घेतली. मात्र तसें करीत असतां आधुनिक युरोपानें ज्या हिंसेच्या साधनाचा उपयोग सत्याच्या संस्थापनेसाठीं म्हणून केला त्या हिंसेचें साधन त्यांनीं दूर लोटलें. कारण, हिंसक साधनांनीं केलेल्या क्रांतींतून सनातन जीवनमूल्यें सुरक्षित ठेवणारी समाजरचना निर्माण होऊं शकत नाहीं असा बोध त्यांनीं आधुनिक युरोपच्या इतिहासापासून घेतला. एवढा बोध घेऊनच ते स्वस्थ बसले नाहींत तर त्यांनीं लोकशाहीची व समाजवादाची क्रांति अहिंसेनें घडवून आणण्याचें एक शस्त्र भारतीय जनतेच्या हातीं दिलें. सत्याग्रहरूपी शस्त्राच्या प्राप्तीमुळें भारतीय जनता क्रांतिकारक बनली आणि तिला धर्माचें क्रांतिकारक स्वरूप आकलन झालें. धर्माचें हें क्रांतिकारक स्वरूप ओळखणें हेंच आधुनिक युगाचें विशेष लक्षण असून त्या ज्ञानामुळेंच भारतीय जनता मध्ययुगीन अवस्थेंतून आधुनिक युगांत प्रवेश करूं लागली आहे.

धर्मभावनेवर घेण्यांत येणारा आणखी एक आक्षेप असा आहे कीं ही भावना परंपरावादी असल्यामुळें तिला प्रगतिकारक किंवा क्रांतिकारक स्वरूप केव्हांहि प्राप्त होणार नाहीं. वरील अनेक आक्षेपांप्रमाणें हा आक्षेपहि ऐतिहासिक दृष्टीनें निराधार आहे. श्रीकृष्ण, गौतमबुद्ध, महावीर, येशू ख्रिस्त किंवा महंमद पैगंबर यांच्या जीवनांत धर्मभावनेला क्रांतिकारक स्वरूप प्राप्त झालेलें असून त्या त्या धर्मपुरुषांच्या काळांत केवळ धर्म व अध्यात्म एवढ्याच क्षेत्रांत नव्हे तर समाजघटनेच्या सर्व अंगांत क्रांतिकारक बदल घडून आल्याचें इतिहासांत नमूद आहे. धर्म मानवी जीवनाचीं सनातन मूल्यें रक्षण करण्याचा आग्रह धरतो हें जितकें खरें आहे, तितकेंच हेंहि खरें आहे कीं या जीवनमूल्यांना जेव्हां प्रस्थापित समाजघटनेंत अवसर उरलेला नसतो तेव्हां त्यांच्या संस्थापनेसाठीं सामाजिक क्रांति करण्यासहि तो प्रवृत्त होत असतो. त्यामुळेंच धर्मभावनेला व आत्मप्रेरणेला विशिष्ट परिस्थितींत सामाजिक क्रांतिकारक स्वरूप प्राप्त होत असतें. ज्या वेळीं सनातन जीवनमूल्यें समाजघटनेंत अंतर्भूत झालेलीं असतील त्या वेळीं ती समाजघटना मोडूं देऊं नये आणि ज्या वेळीं हीं जीवनमूल्यें समाजघटनेमुळें उद्ध्वस्त होत असतील त्या वेळीं ती समाजघटना उद्ध्वस्त करून तिच्यांत क्रांतिकारक बदल घडवून आणावेत हेंच धर्मभावनेचें शुद्ध व श्रेष्ठ स्वरूप होय. याच शुद्ध व श्रेष्ठ धर्मभावनेंतून **सत्याग्रही सर्वोदयवाद** ही निष्ठा निर्माण झाली असून ती आधुनिक मानवाला सामाजिक क्रांतीचा अहिंसक मार्ग दाखवून देत आहे.

## धर्मासाठीं व मोक्षासाठींच क्रांति

सत्याग्रही सर्वोदयवादानें आधुनिक युरोपांतील लोकशाही व समाजवादी क्रांत्यांचें रहस्य आत्मसात् केलें आहे, इतकेंच नाहीं तर अशा प्रकारची क्रांति करणें हें आज धार्मिक व आध्यात्मिक कर्तव्यच बनलें आहे अशी वृत्ति या निष्ठेनें निर्माण केली आहे. आधुनिक युरोपांतसुद्धां सतराव्या शतकांत जेव्हां प्रथमतः अशा प्रकारचे क्रांतिकारक प्रयत्न घडूं लागले, तेव्हां त्यांच्या बुडाशीं हीच शुद्ध धर्मनिष्ठा व मोक्षप्रवृत्ति होती. परन्तु तेथील ख्रिस्ती धर्मसंस्थेनें राज्यसंस्थेशीं व धनिक वर्गाशीं सख्य करून हे क्रांतिकारक प्रयत्न दडपून टाकण्यास साहाय्य केलें. यामुळें तेथील क्रांतिकारकांनीं धर्माला व अध्यात्माला उखडून टाकण्याचा चंग बांधला. अशा रीतीनें धर्मसंस्थेचे संरक्षक आणि क्रांतिकारक हे दोघेहि खऱ्या धर्माचे व खऱ्या अध्यात्माचे शत्रू बनले. परिणामतः धर्मभावना व क्रांतिकारक वृत्ति या दोहोंनाहि विकृत स्वरूप प्राप्त झालें.








नाहीं. कॅांग्रेसला सामाजिक अधिष्ठान तीन प्रकारांनीं मिळालें आहे. एक म्हणजे सर्वसामान्य राष्ट्रीय जागृति, दुसरें विपन्न स्थितींतल्या बहुजनसमाजाचा पाठिंबा आणि तिसरें पुरोगामी प्रवृत्तीच्या मध्यमवर्गीय शिक्षितांच्या आकाक्षांची पूर्ति होईल असें आश्वासन. या तीन प्रकारांचा कॅांग्रेसला आजपर्यंत पूर्ण फायदा घेतां आला आहे. राष्ट्रीय अहंभावना, बहुजनसमजाचे प्रश्न आणि शिक्षितांच्या आकांक्षा या सर्वांचें समाधान करण्यांत आजपर्यंत कॅांग्रेसनें यश मिळविलें आहे. प्रजासमाजवादी पक्ष हा कॅांग्रेसमधूनच वेळोवेळीं फुटून निघालेल्या सुशिक्षितांचा गट असल्यामुळें त्याचें सामाजिक अधिष्ठान निराळें आहे असें म्हणतां येत नाहीं. फुटून निघाल्यावर या सामाजिक अधिष्ठानाची वांटणी झाली असती तर याहि पक्षास स्वतंत्र सामाजिक पाया आहे, असें म्हणतां आलें असतें. वैचारिक संमिश्रता कॅांग्रेसमध्येंहि फार आहे. ती सूर्यासारख्या एका प्रभावी नेत्याच्या तेजामुळें वरवर लुप्त झाल्यासारखी दिसतें, एवढेंच. ही संमिश्रता कॅांग्रेसमध्येंहि कायम राहिल्यास ती कालांतरानें बाधक झाल्याशिवाय राहाणार नाहीं. प्रजासमाजवादी पक्षाला ती तर फारच बाधली आहे. सामाजिक अधिष्ठान म्हणजे लोकांचा समजूनउमजून पाठिंबा. फार थोड्या लोकवस्तींवर प्रजासमाजवादी पक्षाचा प्रभाव आहे.

तिसरें एक दौर्बल्याचें कारण असें कीं, या पक्षांत नेते जास्त व अनुयायी त्या मानानें कमी; किंवा प्रत्येक महत्त्वाच्या व्यक्तीस विशिष्ट स्थान मिळेल अशीं विविध कार्यक्षेत्रें कमी आहेत. पक्षसंघटनेच्या पाठीशीं संस्थांची व मोठमोठ्या कार्यक्षेत्रांची संघटना असावी लागते. त्या संस्थांच्या मध्यें व संघटनांच्या मध्यें महत्त्वाच्या व्यक्ती गुंतवाव्या लागतात. तशी संस्थांची व कार्यांची संघटना नसल्यामुळें शक्तीच्या योग्य विनियोगाच्या अभावीं मोठ्या व्यक्तींच्या अहंभावाला जोर चढतो; तो अहंभाव समाधान नष्ट करतो. त्यामुळें सुशिक्षित परंतु असंतुष्ट व अहंकारी पांढरपेशांचा ध्येयवादी गट असें स्वरूप या पक्षास प्राप्त झालें आहे.

अलीकडे या पक्षाच्या दौर्बल्याच्या कारणांत एका अत्यंत महत्त्वाच्या कारणाची भर पडली आहे. या नव्या कारणानें केवळ प्रजासमाजवादी पक्षच दुर्बल झाला नसून इतरहि अनेक पक्ष दुर्बल बनत चालले आहेत; व कित्येकांची तर प्रजासमाजवादी पक्षापेक्षांहि अधिक दुर्दशा उडाली आहे. कॅांग्रेस सरकारनें सुरू केलेला पंचवार्षिक नियोजनांचा कार्यक्रम हें तें कारण होय. या कारणानें कॅांग्रेसचें वजन समाजांत वाढलें असून कॅांग्रेस–नियंत्रित राज्याची प्रतिष्ठा व बल अधिकच वाढीस लागलें आहे. १९४७ सालानंतरच्या पांच वर्षांत कॅांग्रेसची प्रतिष्ठा खूपच ओहोटीस लागली होती. त्या वेळीं प्रजेंत असंतोषहि उत्पन्न होऊं लागला होता. हीच संधि साधून या देशांत अनेक पक्षोपपक्ष अस्तित्वांत आले. त्यांतील कांहींना जनतेचा पाठिंबाहि चांगला मिळूं लागला. पंचवार्षिक नियोजनांचें युग सुरू झाल्यानंतर या नव्या पक्षांचे ग्रह पालटले. प्रजासमाजवादी पक्षाचीहि तीच स्थिति झाली. राज्यामार्फत सुधारणा किंवा प्रगति होईल, अशी आशा दिसल्यावर लोक प्रस्थापित राज्यशक्तीला विरोध करण्यास नाखूष असतात. मग ती प्रगति हळूंहळूं होईल असें जरी दिसलें तरी तें त्यांना चालतें. क्रांतिवादाला किंवा अद्भुतकल्पनारम्य ध्येयवादाला केवळ तरल प्रवृत्तीचे महत्त्वाकांक्षी तरुणच आलिंगन देतात. सर्वसामान्य नागरिक व्यावहारिक दृष्टीचे असतात व राजकीय दृष्ट्या अल्पसंतुष्टच राहतात. राज्याच्या पायीं भयंकर दुरवस्था माजली तरच ते क्रांतिकारक शक्तींचें स्वागत करतात. अन्यथा क्रमिक सुधारणावादावर ते समाधान मानतात. उठावाची भाषा त्यांना रुचत नाहीं व क्रांतिकारक विचारसरणी त्यांना पचत नाहीं. काय पटतें यापेक्षां काय पचतें याचें महत्त्व अधिक असतें. कॅांग्रेसपक्षानें पंचवार्षिक नियोजनांचा कार्यक्रम सामाजिक वस्तुस्थिति, प्रजांच्या गरजा व भारतीय अर्थशास्त्राचे निर्णय लक्षांत घेऊन आंखण्याचें ठरवल्यामुळें देशांत प्रक्षोभक स्थितीला उत्तेजित करणाऱ्या परिस्थितीवर तात्पुरता तरी विजय मिळविला आहे. म्हणून जनतेचा असंतोष व प्रक्षोभ हें ज्या पक्षांचें भांडवल, त्या पक्षांना वैफल्याचे व निराशेचे दिवस येऊं लागले आहेत. या वैफल्याच्या पोटीं बंडखोर वा आक्रमक प्रवृत्ति अंतर्मुख बनत चालली आहे. या देशांत खेड्यांतील बहुजनसमाजाचें किंवा शेतकरीवर्गाचें आर्थिक जीवन सुधारण्याचा कार्यक्रम राज्यसरकारांनीं हातीं घेतल्यामुळें या देशांतील मुख्य क्रांतिकारक म्हणून मानली जाणारी बहुजनशक्तीच राज्याला पाठिंबा








देऊं लागलेली आहे. म्हणून बंडखोर वा आक्रमक मनोवृत्तींतून जन्मलेल्या पक्षांना सामाजिक बळ लाभेनासें झालें आहे. ही बंडखोर वृत्ति वर्तमानयुगांतील व्यक्ति-स्वातंत्र्यवादाचें विकृत अपत्य आहे; ही एक प्रकारची मस्ती आहे. त्याला जर अनुकूल सामाजिक पार्श्वभूमि मिळाली तर त्याला उन्नत व उज्ज्वल स्वरूप प्राप्त होतें. परिस्थति प्रतिकूल असल्यास, या वृत्तीला स्वपक्षांतील भांडणें जोरानें भांडणें हें महत्त्वाचें काम मिळतें.

प्रजासमाजवादी पक्षास दौर्बल्य येण्याचें आणखी एक कारण आहे. तें म्हणजे विलक्षण व्यक्तिमत्त्वानें संपन्न अशा नेत्याचा पक्षांत अभाव हें होय. त्यांत सुशिक्षित, शीलसंपन्न व ध्येयवादास वाहिलेल्या बुद्धिमान् व्यक्तींची वाण नाहीं. जी वाण आहे ती अलौकिक प्रभाव उत्पन्न करणाऱ्या व्यक्तिमत्त्वाची. अशा व्यक्ती कॉंग्रेसला म. गांधींच्या व पं. जवाहरलाल नेहरूं-च्या रूपानें लाभल्या. प्रजासमाजवादी नेते कॉंग्रेसमध्यें जेव्हां होते तेव्हां ते गांधींना किंवा नेहरूंना शरण जात. आपणांपेक्षां श्रेष्ठ अशा शक्तीला किंवा व्यक्तीला किंवा संस्थेला किंवा संघटनेला शरण जाण्याची प्रवृत्ति विफल झाल्यासच बंडखोरीची प्रवृत्ति निपजते. पितृपूजेची वृत्ति मनुष्यांत बालपणीं नैसर्गिक रीतीनेंच वाढीस लागते. मोटेपणीं पितृपूजेचें प्रतीकपूजेंत रूपांतर होतें. असें जबरदस्त प्रतीक प्रजासमाजवादी पक्षांत नसल्या-मुळें व पक्षसंघटनेला विशालतेचा किंवा दीर्घ जीवना-चा लाभ न झाल्यामुळें तो पक्ष गुरुत्वमध्याच्या अभावीं विस्कळित होऊं लागला आहे. प्रत्येक प्रौढ, सुशिक्षित व सुप्रसिद्ध सभासदास दुसऱ्या महत्त्वा-च्या सभासदाबद्दल उत्कट जिव्हाळ्याची बंधुत्व-भावना वाटत नाहीं. कारण सगळेच महत्त्वाकांक्षी. दबविणारा खरा किंवा खोटा मोटेपणा कोणाच्याच ठिकाणीं नाहीं. मानमान्यतेची शिस्तबद्ध उतरंड तयार होण्यास पक्षास दीर्घ जीवन व विस्तृत आणि विविध कार्यक्षेत्रें लाभावीं लागतात. तसें कांहीं या पक्षाच्या जमेस नाहीं.

प्रजासमाजवादी पक्षाला आत्मविसर्जनाशिवाय दुसरा योग्य मार्ग सध्यां तरी उपलब्ध होणें शक्य नाहीं. विधिमंडळांतील सत्ताधारी पक्षास विवेकपूर्ण व उचित विरोध करणारा आणि विधायक कार्य-क्रमाला वाहिलेला पक्ष, असा माफक ध्येयवाद या पक्षांतील बंडखोर प्रवृत्तीच्या बहुसंख्य तरुणांना मानवला तरच हा पक्ष दीर्घकाल टिकाव धरूं शकेल. या माफक ध्येयवादाप्रमाणें नजीकच्या काळांत राज्य-सत्ता प्राप्त करून घेण्याची आकांक्षा तृप्त होणें अशक्य आहे. लढ्याचा मार्ग अधिक मोठ्या निराशावादाच्या गर्तेत लोटणारा आहे. माफक ध्येयवाद पक्षांतील बहु-मतास मान्य होणें अशक्य असल्यामुळें विसर्जनाशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. विसर्जन होत असतां, या पक्षांतील सर्वोदयवादाकडे ओढा असलेल्या व्यक्तींनीं संत विनोबांना शरण जावें व भूदान-चळवळीस वाहून घ्यावें. भूदान-चळवळीला बळ आणण्याचें श्रेय पक्षाला मिळालें तरी त्याचें महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या कमी मानलें जाणार नाहीं. मात्र भूदान-चळवळ ही शांतिमय क्रांतीला यशस्वी करील, हें गृहीत कृत्य या विधाना-च्या पाठीशीं आहे. या गृहीतकृत्याची छाननी करणें अत्यंत आवश्यक असें कर्तव्य आहे. ती अजून व्हावी तशी झालेली नाहीं. प्रजासमाजवादी पक्षाला बेबंद-शाहीच्या या दुर्धर परिस्थितींतून शाबूत रीतीनें बाहेर पडतां आलें तर प्रस्तुत लेखकासहि मोठा आनंद होईल व त्या पक्षाचें खुल्या दिलानें हा लेखक अभि-नंदनहि करील. कारण, त्यांत अग्रभागीं असलेल्या व्यक्तींबद्दल अत्यंत आदराची भावना प्रस्तुत लेखका-च्या हृदयांत वसत आहे.

## सविनय कायदेभंगाचें सामर्थ्य

सर्वांगीण सर्वोदयकारी मानवसंस्कृतीची निर्मिति लढ्यावांचून होणार नाहीं. मात्र या लढ्यांतून सर्व वर्गभेद व जातिभेद नष्ट करणारी व मानवाचा सर्वांगीण विकास साधणारी नवसंस्कृति निर्माण कराव-याची असल्यानें हा लढा हिंसेनें न होतां अहिंसेनें होणेंच इष्ट व आवश्यक आहे. या लढ्यांत क्रान्ति व भूतदया या दोहोंचाहि समन्वय घडवून आणला पाहिजे. भूतदया व क्रान्ति यांचें मूर्तिमंत प्रतीक म्हणजे सविनय कायदेभंग होय. ही सविनय कायदे-भंगाची वृत्ति व्यक्ति-जीवनांत व जनतेच्या जीवनांत मुरून जाऊन तो नित्याचा मनोधर्मच बनला पाहिजे. त्याशिवाय, जी भीषण विषमता व अन्याय राष्ट्राराष्ट्रांमध्यें व राष्ट्रान्तर्गत जीवनांत आहेत त्यांचा निरास होणार नाहीं.

— डॉ. राम मनोहर लोहिया

( 'Wheel of History' या पुस्तकांतून






श्री. मधुकर जावडेकर

# कंपनी-कायद्याची सुधारणा आणि मॅनेजिंग एजन्सी

कंपनी बिल १९५३ हें पार्लमेंटमध्यें २ सप्टेंबर १९५३ या तारखेस सादर करण्यांत आलें. या बिलाचा एकंदर मसुदा पाहतां, हें आजपर्यंत कोणत्याहि पार्लमेंटनें विचारांत घेतलेल्या बिलापेक्षां अधिक विस्तृत बिल आहे, हें नाकबूल करतां येणार नाहीं. जवळजवळ ६१२ कलमांचा हा मसुदा १३ विभागांत विभागला असून, त्यांस १२ शेड्यूल्स जोडण्यांत आलीं आहेत. सध्याच्या कायद्या-( Indian Companies Act, 1913 ) चीं एकूण २९० कलमें व ४ शेड्यूल्स आहेत. इंग्लिश कायद्याचासुद्धां पसारा इतका मोठा नाहीं. त्या कायद्यांत ४६२ कलमें व १९ शेड्यूल्स आहेत.

गेल्या अंदाजपत्रकी अधिवेशनांत सदर बिलाचें प्राथमिक वाचन झालें आणि तें बिल संसदेच्या दोन्हीं सभागृहांतील सभासदांच्या संयुक्त समितीकडे सोपविण्यांत आलेलें आहे हें सर्वांस विदित आहेच. सदर समितीवर लोकसभेंतून ३३ व राज्यसभेंतून १६ सभासद नियुक्त केले आहेत. या ४९ सभासदांत श्री. देशमुख, श्री. शहा, श्री. पाटसकर ( चेअरमन ) इत्यादि मध्यसरकारचे प्रतिनिधी आहेत. श्री. सोमाणी, श्री. एस्. पी. जैन, श्री. तुलसीदास किलाचंद इत्यादि भांडवलदार आहेत. आतां मजूरमंत्री झालेले खंडुभाई देसाई समितीवर होते. त्याचप्रमाणें श्री. एन्. सी. चटर्जी, श्री. सी. सी. शहा आदि कायदेपंडितहि आहेत. सर्ववर्गीय प्रतिनिधी असलेली ही समिति गेले आठ महिने बिलावर काथ्याकूट करीत आहे. समितीनें आपली चर्चा संपविली असून आपला अहवाल सादर केला आहे. आतां लोकसभेच्या येत्या अधिवेशनांत बिलावर बहुतेक चर्चा होईल.

या बिलाचा एकंदर रोख, सध्यां अस्तित्वांत असलेली मॅनेजिंग एजन्सीची प्रथा निकालांत काढणें व तिचा अपरिहार्य भाग जबरदस्त बंधनांत जखडून टाकणें असा आहे. असेंहि ऐकण्यांत येतें कीं, पार्लमेंटांतील कामगार-पुढाऱ्यांनीं आपापल्या मतदारसंघांत पुढील निवडणुका होण्यापूर्वी आम्ही मॅनेजिंग एजंटस ही संस्था नाहींशीं झालेली पाहूं, अशीं आश्वासनें दिलीं आहेत. उलट पक्षीं, पार्लमेंटच्या परिसरांत जागरूकतेनें वावरणाऱ्या अभ्यासकांस असेंहि ऐकूं येतें कीं, पार्लमेंटमधील भांडवलदार वर्ग एक प्रकारची आव्हानाची भाषा बोलत आहे. 'कांहीं ठिकाणीं किंवा कांहीं विशिष्ट परिस्थितींत कांहीं मॅनेजिंग एजंटस्नीं अनिष्ट गोष्टी केल्या असतील, पण म्हणून सरसहा सर्व एजंटस्वर त्याचा ठपका ठेवून त्यांना नामशेष करणें न्यायाचें नाहीं व सरकारास तें परवडणार नाहीं' असा या वर्गाचा सूर आहे. मॅनेजिंग एजंटस् हे केवळ व्यवस्थापक नाहींत तर अनेक आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं धंद्यांतील सर्व अनिश्चितता पत्करली आणि भांडवलपुरवठा केला. हिंदुस्थानसारख्या अप्रगत देशांत भांडवलउभारणी करून औद्योगिक अभिवृद्धि करण्यांत या वर्गाचा भरपूर भाग असल्यानें त्यांचेकडे केवळ काकदृष्टीनें पहाणें योग्य नव्हे असें त्यांना वाटतें. दोन्ही पक्षांच्या म्हणण्यांत सत्यांश आहे हें कोणासहि पटेल. सदर मर्यादित लेखांत मॅनेजिंग एजंटस् ही संस्था काय आहे आणि काय नाहीं याचा धावता आढावा सादर केलेल्या बिलाच्या अनुषंगानें घ्यावयाचें योजिलें आहे.

कायदा झाला तरी, भोंवतालच्या परिस्थितीच्या अपरिहार्यतेमधूनच त्यानें आकार धारण करावा हें सामान्य जनांस अधिक सयुक्तिक वाटतें. प्रथम परिस्थितीशीं प्रतिलोम अशी कायद्याची चौकट ठाकून-ठोकून बसविण्यासाठीं जिवाचा आटापिटा करावयाचा आणि मग त्या चौकटीबाहेर चौक्या-पहारे बसवून अतिक्रमण करणाऱ्यांची मानगूट पकडीत राहायचें ही कांहीं फारशीं आदर्श यंत्रणा म्हणता येणार नाहीं.










यांतून कायदेशीरपणा व्यवहारांत बळावण्याऐवजीं, कायदेबाजपणाच वाढीस लागतो आणि कायद्या-च्या चौकटींतून पळवाटा शोधण्याकडेच सारी बुद्धि व्यतीत होते. वकीलवर्गाची पोळी पिकते आणि चार-दोन कायदेभंग सहजपणें पचविले कीं ज्यांच्या इष्टवर्तनासाठीं कायदा केला, तेच मुळीं कायद्याला भीक घालेनासे होतात.

कंपनी-कायदा हा तर मुख्यतः कंपन्या व त्यांचे प्रवर्तक – म्हणजे पर्यायानें भांडवलदार वर्ग – यांना लागू असल्यानें, त्यांना कोणत्याहि कायद्यास बगल देण्याची कला सहजसाध्य आहे. लिहिण्याचा उद्देश असा कीं, आपल्या देशाच्या आजच्या परिस्थितींत इतकें अवाढव्य बिल हातीं घेण्यापेक्षां जरूर त्या व तेव्हां प्रस्थापित कायद्यांत सुधारणा करीत राहणेंच अधिक बरें झालें असतें.

## बिलाचे उद्देश आणि मॅनेजिंग एजन्सी

बिलाच्या उद्देशपत्रिकेंत खालील उद्देश प्रामुख्यानें सांगितले आहेत :

१ कंपनीच्या प्रतिष्ठापनेंत आणि कार्यांत व्यत्यय न येतां, कारभारांत कांहीं किमान दर्जा कायम राहावा.

२ कंपनीच्या प्रॉस्पेक्टस्‌मध्यें जास्तीत जास्त माहिती जाहीर व्हावी व घातुक गुप्तता नाहींशी व्हावी.

३ कंपन्यांच्या कारभारावर स्पष्ट प्रकाश पडेल अशा स्वरूपांत हिशेब ठेवले जावे, आणि ते तसे व्हावेत.

४ कंपन्यांच्या व्यवस्थेवर स्वतःचें जागरूक नियंत्रण राहील अशासाठीं त्यांच्या बैठका भरतील अशी तरतूद असावी.

५ कायद्याची योग्य अंमलबजावणी साधली जावी.

हीं सर्व उद्दिष्टें साध्य व्हावींत म्हणून सदर बिलानें सभासदांचे अधिकार वाढविले आहेत, डायरेक्टरांचे अधिकार व कर्तव्यें वाढविलीं आहेत व मॅनेजिंग एजंटस्‌चे अधिकार मर्यादित केले आहेत. ऑडिटर्सचें काम व क्षेत्र व्यापक केलें आहे. आणि जरूर तेव्हां मध्य – सरकारला हस्तक्षेपासाठीं सुभा राहील असें स्वातंत्र्य दिलें आहे.

## मॅनेजिंग एजन्सी

आज येथील औद्योगिक क्षेत्रांत तरी मॅ. एजन्सी ही प्रमुख संस्था आहे. हिंदुस्तानांतील एकूण कंपन्यांची संख्या सुमारे २८५०० असून एकूण गुंतविलेलें भांडवल (सुरवातीच्या भावानें) १६०० ते १७०० कोट रु. आहे. यांपैकीं ८० टक्क्यांहून अधिक भांडवल मॅ. एजंटस्‌नीं चालवलेल्या कंपन्यांत गुंतलें आहे. या मॅनेजिंग एजंटस्-कन्सर्न्सपैकीं ६० टक्क्यांवर मर्यादित जबाबदारी फर्म्स आहेत. यावरून सध्याच्या औद्योगिक क्षेत्रांत या पद्धतीचें महत्त्व किती आहे तें समजतें. इंग्लंड-अमेरिकेंत ही प्रथा अस्तित्वांत नसली तरी जहाजबांधणीसारख्या उद्योगांत मॅनेजर किंवा एजंटतर्फे व्यवस्था पाहिली जाते. तें एतद्देशीय पद्धतीशीं थोडेफार जुळणारें आहे. इंग्लिश कंपनी-कायदा (१९४८)हा या प्रथेस मंजुरी देतो. अमेरिकेची औद्यो-गिक प्रगति इंग्लंडपेक्षां वेगवान् आहे. तेथील कांहीं मोठ्या कंपन्यांच्या गटाची व्यवस्थाहि आपल्याकडील मॅ. एजंटस्‌शीं जुळणारी आहे. या पद्धतींत, अनेक कंपन्यांत ज्यांचा हात आहे अशा एका एका कंपनीचे गट शास्त्रीय, व्यवस्थापकीय, आर्थिक साहाय्य अनेक कंपन्यांना देतात. त्याबद्दल या कंपनीस कांहीं वेतन, कमिशन मिळतें. असें समजण्याचें कारण नाहीं कीं केवळ हिंदुस्थानांतच मॅ. एजन्सी ही संस्था आहे. थोड्याफार फरकानें प्रगत औद्योगिक देशांतहि ती कार्य करीत आहे.

## मॅनेजिंग-एजंटस्‌विषयक बिलांतील कलमें

कलमें ३०७ ते ३५९ मध्यें याविषयीं कांहीं तर-तुदी दिल्या आहेत. प्रचलित कायद्यांत फक्त ९ कलमें या विषयासाठीं खर्ची पडलीं आहेत, तर बिलांत ५२ कलमें योजिलीं आहेत. मॅ. एजंटस्‌चे अधिकार बरेच खच्ची केले आहेत. डायरेक्टरांच्या देखरेखीखालीं व नियंत्रणाखालीं त्यांना काम करावें लागेल; त्यांची मुदत १५ वर्षांची व ती १० वर्षेपर्यंत वाढणारी. १५ ऑगस्ट १९५९ ला सध्यांच्या मॅ. एजन्सी संपुष्टांत येणार. वट्ट नफ्याच्या १२॥ टक्क्यांहून अधिक कमिशन असूं नये, अधिक कमिशन, खास ठराव व सरकारी मंजुरी यानंतरच मिळणार, किमान वेतन ५०,००० रु. पेक्षां अधिक नाहीं, ऑफिस-भत्ता नाहीं, मॅ. एजंटस्‌नी अन्य कोणास एजन्सीबद्दलचे हक्क द्यावयाचे झाल्यास कंपनीचा खास ठराव होणें जरूर; मॅनेजिंग एजंट किंवा 'असोशिएट' याला विक्री-एजंट म्हणून नेमतां येणार नाहीं; तसें नेमावयाचें झाल्यास, ज्या राज्यांत मालाचें उत्पादन होत












आहे किंवा कंपनीचें मुख्य ऑफिस आहे त्या राज्याबाहेर विक्री-एजंटचें ऑफिस असणें जरूर आहे. विक्री-एजंटास द्यावयाचें कमिशन खास ठरावानें ठरवलें जाईल. अशाच प्रकारची तरतूद मॅनेजिंग एजंटनें कंपनीतर्फे करावयाच्या खरेदीसाठीं आहे. कंपनीनें मॅ. एजंटांस कर्ज द्यावयाचें नाहीं किंवा दुसऱ्या कोणी त्यांस तें दिलें असल्यास, कंपनीनें धनकोस मॅ. एजंटाबद्दल जामीन राहावयाचे नाहीं. तसेंच एकाच मॅ. एजंटाच्या अधिकारांत अनेक कंपन्या असल्या तर एकीनें दुसरीस, त्या कंपनीच्या खास ठरावाशिवाय, कर्ज द्यावयाचें नाहीं. एका कंपनीस आपल्या भांडवला-पैकीं कांहीं रक्कम दुसऱ्या कंपनींत गुंतवायची असेल तर त्यांस नियम व मर्यादा सांगितली आहे. ज्या कंपनीस गुंतवणुक करावयाची आहे त्या कंपनीच्या डायरेक्टरांनीं एकमतानें ठराव करावयास हवा. आणि त्याच गटांतील ज्या कंपनींत भांडवल गुंतवायचें त्या कंपनीच्या विकलें गेलेल्या भांडवलाच्या १० टक्क्या-पयत व जी कंपनी भांडवल गुंतवणार तिच्या विकलेल्या भांडवलाच्या २० टक्क्यांपेक्षां अधिक रक्कम गुंतवतां येणार नाहीं. कंपनीनें खास ठराव केला तरच या मर्यादा ओलांडतां येतील.

प्रत्यक्ष मॅनेजिंग एजंटस्‌ना लागूं असलेलीं कलमें अशा प्रकारचीं आहेत. पण याशिवाय अल्पमतवाल्या भागीदारांचे अधिकार ( कलमें ३६७–७७ ), मध्य-सरकारचे अधिकार, कायदेभंगाबद्दल शासन, खास ठरावां-( Special Resolutions ) ची जरूरी, भांडवल-रचना व मतदान हक्क ( क. ७९–८३ ) इत्यादि विषयांखालीं जीं कलमें आहेत त्यांचाहि अप्रत्यक्ष हेतु मॅनेजिंग एजंटस् या संस्थेच्या कार्यपद्धतींत शिस्त व संयम आणणें असाच आहे. भाभाकमेटीनें आपल्या अह-वालांत या विषयाची सूक्ष्म तपासणी करून मग निवाडा दिला आहे तोच या बिलाचा पाया आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे बिलाच्या प्रधान हेतूबद्दल स्पष्ट कल्पना येते. बिलाच्या ६१२ कलमांपैकीं जवळ जवळ १४० कलमांत शासन ( Penalties ) सांगितलें आहे.

## मॅनेजिंग एजन्सीचें आतांपर्यंतचें कार्य

सर्वसाधारण समज असाच आहे कीं या संस्थेचें अवतारकार्य आता संपलें आहे; केव्हां एकदां त्यांनीं अमोल कामगिरी केली असेल ती असो; आज भागीदारांच्या पैशावर स्वतःची पोळी पिकवणारी ही जमात आहे; कंपनी जगो वा मरो, आपला फायदा फुगवून मिळावा इतकीच यांची अपेक्षा. हें जरी खरें असलें तरी याला दुसरीहि बाजू आहे.

बहुतेक उत्पादनकारखाने त्यांच्या बँकांच्या साहा-य्यावर अवलंबून असतात. बँका ओव्हरड्राफ्टस्, कर्जें इत्यादि मार्गांनी हें साहाय्य देत असतात. या सर्व बाबतींत हीं कर्जें किंवा ड्राफ्टस् कंपन्यांच्या मॅ. एजंटस्‌नीं पुरस्कारावेत अशी बँकांची अपेक्षा असते. अगदीं इंपीरिअल बँकसुद्धां त्याला अपवाद नाहीं. अशा वेळीं मॅ. एजंटस्‌नीं हीं आश्वासनें दिलीं आहेत असें आढळून येतें.

खालील[1] आंकडयांवरून वरील विधान कांहींसें स्पष्ट होतें. १९५२–५३–५४ या काळांत सुमारे २२ कंपन्यांनीं काढलेल्या कर्जांपैकीं १२·३ कोटी रुपयांची रक्कम मॅनेजिंग एजंटस्‌नीं खुद्द जामीन देऊन कंपन्यांना मिळवून दिली.

याचबरोबर धंद्यांच्या प्राथमिक अवस्थेंत आर्थिक परिस्थिति पाहून मॅ. एजंटस्‌नीं आपलें कमिशन अजिबात सोडून दिल्याचीं उदाहरणें आहेत. खालील आंकडे पहा :

| कंपनीचें नांव | वर्ष | मॅ. एजंटनीं स्वतःच्या जामीनकीवर मिळवलेली ( लाख रु. ) |
|---|---|---|
| १. बेंगाल ज्यूट मिल्स कं. लि. | १९५३ | १२५ |
| २. भारत शुगर मिल्स | १९५३ | ४० |
| ३. न्यू इंडिया शुगर मि. | १९५३ | ६५ |
| ४. न्यू स्वदेशी शुगर मि. | १९५३ | ५० |
| ५. औंध शुगर मि. | १९५३ | ९० |
| ६. श्रीअंबिका मिल्स. | १९५३ | ५० |
| ७. टाटा लोकोमोटिव्हज् | १९५२ | २८५ |








| | |
|---|---|
| हिंदुस्तान मोटार्स लि० ( बिर्ला ब्रदर्स लि० ) विकलेलें भांडवल ५ को. रु. | १९४२ साली कंपनी स्थापन झाली. १९५२–५३ पर्यंत सर्व वेतन मॅ. एजंटस्नीं सोडून दिलें. |
| टाटा केमिकल्स लि. ( टाटा इंडस्ट्रीज लि० ) वि. भां. १·५ को. रु. | स्थापना १९३९ १९४२-४३ ते ४७-४८ पर्यंत ऑफिस भत्ता व ४२-४३ मध्यें वेतन घेतलें नाहीं. |
| टाटा लोको० इंजि. वर्क्स. ( टाटा इंडस्ट्रीज लि० ) ५ को. रु. | १९४५ मध्यें कंपनी रजिस्टर. १९४७–४८ मध्यें कमिशन घेतलें नाहीं. |

यांशिवाय मॅ. एजंटस् स्वतःच भांडवल-पुरवठा करतात. अशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत :

| | वर्ष | लाख रु. |
|---|---|---|
| हिंदुस्थान जनरल इले० कार्पोरेशन लि. | १९४८–४९ | ९ |
| | ४९–५० | ११ |
| | ५०–५१ | १८ |
| | ५१–५२ | ३२ |
| | ५२–५३ | ३८ |
| | ५३-५४ | ४१ |
| नवानगर इले. सप्लाय कं. लि. ( जामनगर ) विकलेले भांडवल २५ लाख | | ३०·९५ |
| टाटा केमिकल्स लि. | १९४६–४७ ते १९५०–५१ | १५ |

ही यादी हवी तेवढी फुगवितां येईल. पण स्थलाभावीं केवळ नांवेंच द्यावयाची तर, बेलसुंड शुगर कं., इंडियन पेंट कलर अँड वार्निश कं., जेहांगिर वकील मिल्स लि., विक्रम मिल्स लि., न्यू कमर्शिअल मिल्स, अरुणा मिल्स लि., अहमदाबाद न्यू कॉटन मिल्स कं. लि., नूतन मिल्स लि० इत्यादि. यांशिवाय इतर मार्गांनींहि एजंटस् भांडवल-पुरवठा करीत असतात. उदा० टाटा केमिकल्समध्यें मॅ. एजंटस्नीं विकलेल्या भांडवलापैकीं ९ टक्के स्वतःच घेतलें. अरविंद मिल्स लि. मध्यें २७ लाख रुपयांवर भांडवल त्यांनीं घेतलें. १९४७–४८ या वर्षी टाटा केमिकल्सनीं कांहीं परकीय तज्ज्ञ फॅक्टरी तपासण्यासाठीं आणले. त्यांच्या खर्चापैकीं सुमारें ५ लाख रु. मॅनेजिंग एजंटस्नीं पदरचे दिले.

यावरून असें दिसून येतें कीं मॅनेजिंग एजंटस् कंपनीच्या व्यवहारांत केवळ भारभूत नसतात. आर्थिक मदत करण्यांतहि त्यांचा वांटा भरपूर असतो. श्री. जे. आर. डी. टाटा २८ जुलै १९५३ रोजीं केलेल्या आपल्या टेल्कोसमोरील भाषणांत म्हणाले कीं, "इंपीरिअल बँकेच्या सध्याच्या आर्थिक साहाय्याखेरीज मॅ. ए. च्या आश्वासनावर २५ लाखांचें कर्जहि मिळविलें. आणखी ३० लाख असेंच मिळविण्यांत येत आहे. सर्व रक्कम लक्षांत घेतां मॅ. एजंटस्नीं जामीन दिलेलें भांडवल सुमारे २८५ लाखावर होतें. आजच्या काळांत मॅ. एजन्सीबद्दल तक्रारी करणें व कांहीं ठिकाणचे दोष पाहून सर्वच एजंट्स्ना टपका देणें ही आवडती प्रथा असली, तरी मॅ. एजंट्समुळें या कंपनीस केवढें आर्थिक स्थैर्य मिळालें तें पहाण्यासारखें आहे. "

याशिवाय मॅ. एजंटस् कंपनीस भरपूर तज्ज्ञ व तंत्रविषयक साहाय्य करतात असें आढळतें. एकच एजंटस् अनेक कंपन्या चालवीत असल्यानें त्यांना अशा प्रकारचें विशेष साहाय्य मिळवणें सोपें पडतें. औद्योगिक संशोधन, करपद्धतीबाबत तज्ज्ञांचा सल्ला, कामगारप्रश्नांवर तज्ज्ञांची मदत, अशा अनेक क्षेत्रांत एकच तज्ज्ञगट काम करीत असतो. या गोष्टीवर इतका खर्च एरव्हीं होणार असतो कीं एकट्या-दुकट्या कंपनीस अशी तज्ज्ञ-मदत जवळजवळ न परवडण्याइतकीच महाग असते.

## मॅनेजिंग एजंट्स्चें कमिशन

मॅ. एजंटस् म्हणजे या ना त्या नांवाखालीं भरमसाट नफा उकळणारा कंपूशाही होय, हा एक सर्वमान्य समज आहे. असा समज जनतेचा व्हावा याला भरपूर पुरावाहि असेल. पण हा प्रकार सर्वसाधारण कंपन्यांच्या बाबतींत खरा नव्हे. कंपनीच्या बाल्यावस्थेंत मॅ. एजंटस् हेच सर्व प्रकारची अनिश्चितता पत्करतात, नुकसान सोसतात, कष्ट करतात. योजकत्व ( Entrepreneurship ) या देशांत दुर्मिळच आहे. त्यासाठीं अडचणींतून मार्ग काढणाऱ्या एजंट्स्ना फायद्यांत अधिक वांटा कां मिळू नये, असें ते विचारतात.

दुसरें असें कीं सरसहा मॅ. एजंट्स् हे गैरवर्तन करणारे असतात असें कां समजावें ? अहमदाबादच्या



अनुक्रमणिका






कापडगिरण्यांत कांहीं अनिष्ट गोष्टी आढळल्या असतील. पण म्हणून सर्वच क्षेत्रांत अनाचार कसा असेल ? अहमदाबादच्या ६० गिरण्यांच्या गटांतील एकत्रित आंकडे खालीं दिले आहेत. हे १९४० ते ५२ मधील आहेत.

| | कोट रुपये |
|---|---|
| एकूण नफा ( नुकसान वजा जातां ) | १३१·३७ |
| घट आकारणी ... ... | १५·३३ |
| भागीदारांना विनाकर डिव्हिडंड ... | १०·५७ |
| कामगार बोनस ... ... | १४·७१ |
| मॅ. एजंट्सचें वेतन ( करपात्र ) ... | २५·२८ |

हें कमिशन घट-आकारणीपूर्वी फायद्याच्या १९·२ टक्के आहे. पण यावरील प्राप्तिकर, सुपर टॅक्स इ० वजा जातां तें १२ टक्क्यांहून अधिक नाहीं.

मॅ. एजन्सीपद्धत आज देशास टाकतां येणार नाहीं असें म्हटलें जातें. वाढत्या औद्योगीकरणांत सुरवातीचें भांडवल उभें करण्यास केवळ मॅ. एजंटस्च यशस्वी होतील. टाटा लोको० च्या भांडवलांपैकीं ४० टक्के मॅनेजिंग एजंट्सनीं गोळा केलें. मॅ. एजंट्सच्या अभावीं बोर्ड ऑफ डिरेक्टर्स हीं कामें करू शकणार नाहींत. डायरेक्टर्स सर्व वेळ देणारे नसतात. चुकीचे निर्णय घेण्यानें डायरेक्टरांचा जेवढा तोटा होतो त्यापेक्षां मॅ. एजंट्सचा फार अधिक होणार असल्यानें तसा संभव कमी असतो. धोरणांतील सातत्य अनिश्चित डायरेक्टरांमुळें टिकत नाहीं. मॅनेजिंग डिरेक्टर कीं मॅ. एजन्सी फर्म असाहि एक वाद निर्माण होतो. पण एजन्सी फर्म ही एकट्या डिरेक्टरापेक्षां केव्हांहि अधिक बरी म्हणावी लागेल.

मॅनेजिंग एजंट्स् किंवा त्यांचे प्रवक्ते यांची कैफियत अशा प्रकारची आहे. यांतील मुख्य आशय कांहींसा खरा आहे. देशांतील औद्योगिक प्रगति आजवर तरी मॅनेजिंग एजन्सी पद्धतीनुसारच झाली आहे. पण त्यांस कारणें आहेत तीं या संस्थेची अपरिहार्यता दाखवणारीं नसून, देशांतील अप्रगत व अनियोजित अर्थपद्धतीच्या वातावरणांतून निपजलेलीं अशीं तीं आहेत. दुसऱ्या एकाद्या पद्धतीस आजवर न्याय्य वाव ( fair deal ) मिळालाच कोठें ? उलट पक्षीं, कांहीं प्रमुख उद्योगधंद्यांत मॅ. एजंट्सनीं जो सांवळागोंधळ घातल्याचें जनतेच्या निदर्शनास आलें, तो पहातां या संस्थेस मर्यादा घालणें जरूर आहे असेंच वाटतें.

# आंतरराष्ट्रीय राजकारण
# सारसंकलन

## ऑस्ट्रिया-करार

नुकताच ऑस्ट्रियाशीं रशियाचा जो करार झाला त्याबाबत लंडन ' टाइम्स 'नें ( १६-५-५५ ) पुढीलप्रमाणें मत व्यक्त केलें आहे :

" अत्यंत आनंदोत्सवाच्या वातावरणांत व्हिएन्ना येथें काल ऑस्ट्रियाकरारावर सह्या झाल्या आणि पुनः सार्वभौम, स्वतंत्र आणि लोकशाही राज्य म्हणून ऑस्ट्रिया अस्तित्वांत आला. परकीय सत्ता पूर्णपणें नाहींशी होऊन हें स्वातंत्र्य पुरेपुरें प्रत्यक्षांत येण्यासाठीं या कराराला सह्या करणाऱ्या राष्ट्रांची मान्यता मिळावी लागेल. त्याचप्रमाणें ऑस्ट्रिया तटस्थ राहील याबद्दलची रशियाला हवी असलेली हमी समाधानकारकपणें व्यक्त करणारी शब्दरचनाहि शोधून काढावी लागेल. तथापि तसें करणें कठिण नाहीं.

" ऑस्ट्रियाचें जर्मनीशीं राजकीय वा आर्थिक ऐक्य होईल अशी फ्रान्स इटली वा युगोस्लाविया यांच्याप्रमाणेंच रशियाला वाटणारी भीति देखील रास्त आहे. हें ऐक्य होऊं नये अशी कराराच्या चौथ्या कलमांत तरतूद करण्यांत आली आहे. कराराच्या दुसऱ्या कलमान्वयें त्यावर सह्या करणाऱ्या चारहि राष्ट्रांनीं ऑस्ट्रियाच्या भूमीवर अतिक्रमण होणार नाहीं आणि आस्ट्रियाचें राजकीय सार्वभौमत्व कायम राहील अशी हमी दिली आहे. व्हिएन्नांतील सध्यांच्या वातावरणांत ऑस्ट्रियांत दुसरें स्वित्झर्लंड निर्माण करण्याचें कार्य सुरूं आहे.

" ( सरहद्दीवरील रक्षकांसुद्धां ) एकूण ऑस्ट्रियन लष्कराची मर्यादा ५३००० शिपायांची असावी आणि ऑस्ट्रियाचें हवाईदल फक्त ९० विमानांचें असावें हें मूळ करारांतील १७ वें कलम गाळण्यास रशियानें संमति दिल्यामुळें आस्ट्रियाला हा मार्ग सुकर










अनुक्रमणिका

झाला. या मान्यतेचा अर्थ असा कीं स्वित्झर्लंडची तटस्थता आजूबाजूच्या राष्ट्रांच्या उदार धोरणावर जितकी अवलंबून आहे तितकीच ती स्वित्झर्लंडच्या सामर्थ्यावरहि अवलंबून आहे. त्याचप्रमाणें गेल्या पंधरवड्यांत कराराच्या मूळच्या मसुद्यांत अनेक लहानमोठे बदल करण्यासहि रशियानें संमति दिली आहे.

" ऑस्ट्रियांतील आजचा प्रमुख उद्योगधंदा म्हणजे तेलाच्या खाणी. त्यावर ऑस्ट्रियाचा ताबा रहाणार आहे. मात्र पुढील दहा वर्षेपर्यंत उत्पादनाच्या सुमारें १/३ हिस्सा रशियास द्यावा लागेल. आजवर आपलेंच तेल रशियाकडून परत विकत घेणं आस्ट्रियाला भाग पडत होतें. यापेक्षां ही परिस्थिति अधिक चांगली होय.

" त्याचप्रमाणें रशियन शासनाखालीं असलेल्या पूर्वीच्या जर्मन संपत्तीचा मोबदला रोख रकमेऐवजीं सहा वर्षांत मालाच्या रूपानें आस्ट्रियानें द्यावयाचा आहे. या संपत्तीची किंमत अधिक लावण्यांत आली आहे. उत्पादनक्षमता निर्माण होण्यासाठीं ऑस्ट्रियाला बरेंच भांडवलहि गुंतवावें लागेल. तथापि युगोस्लावियाप्रमाणेंच ऑस्ट्रियाहि कराराच्या पलीकडे दूरवर पहात आहे. शीतयुद्धाचा परिणाम म्हणून या दोन्ही देशांचे पूर्वेकडील व्यापाराचे परंपरागत मार्ग बंद झाले आहेत. रशियाच्या समजूतदारपणाच्या धोरणामुळें मध्ययुरोपांतील व्यापार पुनः खुला होण्याची त्यास आशा वाटत आहे.

" बेलग्रेड येथें रशिया — युगोस्लाव्हिया यांच्यांत लवकरच होणाऱ्या चर्चेत इतर कोणतेहि विषय निघोत. पण त्याबरोबरच रशियाच्या अंकित असलेल्या पूर्वेकडील राष्ट्रांशीं व्यापारी दळणवळण सुरूं होण्याचा प्रश्न चर्चिला जाईल असें गृहीत धरून चालावयास हरकत नाहीं. "

## रशिया आणि निःशस्त्रीकरणाचा प्रश्न

जागतिक निःशस्त्रीकरणासंबंधींच्या रशियाच्या नव्या योजनेबाबत कांहीं मतें पुढें दिलीं आहेत :
" या गुंतागुंतीच्या आणि त्रासदायक प्रश्नाची पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील राष्ट्रें यांच्यांत चर्चा सुरूं झाल्यापासून अखेरीस एकमत होण्याची बलवत्तर आशा या योजनेमुळें वाटूं लागली आहे. अर्थात् रशिया जें म्हणत आहे त्यांत त्याचा हेतु खराखुरा प्रकट झाला आहे असें मानल्यासच हें विधान यथार्थ म्हणतां येईल. निःशस्त्रीकरणाच्या व्यवहार्य योजनेबाबत कम्युनिस्ट आणि पाश्चात्त्य राष्ट्रांचे दृष्टिकोण एकाएकीं एकत्र येऊं लागल्यासारखे दिसत आहेत. अँथनी नटिंग यांनीं म्हटल्याप्रमाणें पाश्चात्त्य राष्ट्रांच्या भूमिकेकडे रशिया एकदम वळल्यामुळें हें घडत असलें तरी त्यांत कसलाहि दोष नाहीं.

" मॉस्कोकरवीं पुढें मांडण्यांत आलेला प्रत्येक मुद्दा आतां अत्यंत काळजीपूर्वक व सांगोपांगपणें विचारांत घेतला जाणें जरूर आहे. निःशस्त्रीकरणाविषयींची सध्यां सुचविण्यांत आलेली आंतरराष्ट्रीय नियंत्रणाची पद्धत स्पष्ट स्वरूपांत पुढें मांडण्यांत न आल्याकारणानें ती मान्य होण्यासारखी आहे किंवा नाहीं याबद्दल कांहींच म्हणतां येत नाहीं. अडचणी ध्यानांत घेणें ही पहिली महत्त्वाची पायरी होय. तथापि त्याबरोबरच पाश्चात्त्य राष्ट्रांना या बाबतींत समझोता नको आहे असें कुणाचेंहि मत होतां कामा नये. रशिया आतां देत असलेल्या सवलती या, दीर्घ कालपर्यंत चालूं असलेल्या वाटाघाटी आणि पाश्चात्त्य राष्ट्रांनीं मागें दिलेल्या सवलती, यांचा परिणाम होय हें आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे. ही कांहीं केवळ एका बाजूचीच देणगी नव्हे.

" तीन महत्त्वाच्या दिशांनीं रशियानें आपली भूमिका बदलली आहे. परंपरागत शस्त्रसामग्री कमी करण्यापूर्वी अन्नवस्त्रांचें उत्पादन आणि सांठा बंद केला पाहिजे असा त्याचा आतां आग्रह नाहीं. लष्कर विशिष्ट प्रमाणांत कमी करण्याऐवजीं विशिष्ट पातळीपर्यंत कमी करण्याची पाश्चात्त्यांची कल्पना त्याला आतां मान्य आहे. विशिष्ट प्रमाणांत लष्कर कमी करण्यांत त्याची बाजू कितीतरी बलवान् राहिली असती. पाश्चात्त्य राष्ट्रांना हव्या असलेल्या आंतरराष्ट्रीय नियंत्रणपद्धतीकडे रशियाहि आतां झुकूं लागल्यासारखा दिसत आहे. यापूर्वींच्या चर्चा या मुद्द्यावर अडखळल्या होत्या. यामुळें रशियाची घोषणा हें या प्रश्नाबाबत महत्त्वाचें पुढचें पाऊल होय हें नटिंग यांचें म्हणणें योग्य आहे. तथापि ध्येय मात्र अजून गांठावयाचें आहे. "

**" न्यूज क्रॉनिकल — १२ मे १९५५**

" निःशस्त्रीकरणाबाबतची पाश्चात्त्य राष्ट्रांची योजना काल रोजीं वॉशिंग्टन येथें प्रसिद्ध करण्यांत आली.








त्यावरून रशियाच्या अलीकडच्या घोषणेंतील कितीतरी भाग पूर्वीच्या पाश्चात्त्य राष्ट्रांच्या सूचनांवरूनच घेतला असल्याचें दिसून येतें. अजूनहि एकमत होण्यासाठीं तपशीलाच्या कित्येक बाबींवर समझोता व्हावा लागेल. तथापि मुख्य तत्त्वांबाबत आतां दोन्ही बाजूंत फारसें अंतर राहिलेलें नाहीं. आंतरराष्ट्रीय इन्स्पेक्शनच्या प्रश्नावर विशेष मतभेद शिल्लक राहिलेला नाहीं ही एक आश्चर्याची गोष्ट होय. निःशस्त्रीकरणपरिषदेंतील ब्रिटनचे प्रतिनिधि अँथनी नटिंग यांनीं हा मतभेद मूलभूत स्वरूपाचा नाहीं असें म्हटलें आहे.

" इन्स्पेक्शनसंबंधीची तरतूद ही पाश्चात्त्य राष्ट्रांना पहिली महत्त्वाची पायरी वाटते. उलट रशियाचें या बाबतींतील म्हणणें संदिग्ध आहे. तथापि ही तरतूद आरंभालाच करणें अशक्य होईल असें रशियाच्या योजनेंत कांहींहि नाहीं.

" इन्स्पेक्शनच्या अधिकाराबाबत मात्र पाश्चात्त्य भूमिका रशियाच्या पुढें जाणारी आहे. कोणत्याहि ठिकाणीं वा कारखान्यांत जाण्याची पूर्ण सवलत इन्स्पेक्टरांना असली पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे.

" ही सवलत उभयपक्षीं सारखीच असावी आणि महत्त्वाचीं बंदरें, विमानतळ, रेल्वे स्टेशन, रस्ते इत्यादि बाबतींत क्रमाक्रमानें ती वाढत जावी अशी रशियाची सूचना आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांच्या सूचनेपेक्षां रशियाचें म्हणणें याबाबतींत अधिक व्यवहार्य वाटतें. ब्रिटनमधील किंवा अमेरिकेंतील कोणत्याहि कारखान्यांत, प्रयोगशाळेंत वा कचेरींत शिरण्याचा इन्स्पेक्टरांना आपण एकदम अधिकार देणार नाहीं हें उघड आहे. यामुळें रशियापासूनहि तशी अपेक्षा करण्याचें कारण नाहीं. "

' मॅन्चेस्टर गार्डियन, ' १४ मे, १९५५

## रशियाचें युगोस्लाव्हियाबाबत धोरण

बेलग्रेडच्या विमानतळावरील क्रुश्चेवच्या खेदजनक पण विनोदी घोषणेनंतर सोविएट आणि युगोस्लाव नेत्यांच्या चर्चेसंबंधीं कांहींच महत्त्वाचें वृत्त आलेलें नाहीं. आणि क्रुश्चेव परत गेल्यानंतर देखील सहजीवनासंबंधींहि कांहीं ठराविक घोषणापलीकडे कांहीं समजेल असेंहि दिसत नाहीं. मध्यंतरीच्या काळांत मात्र क्रुश्चेवनें थोडेसें बोलून सर्वांस तर्कवितर्क करावयास लावलें आहे. मार्शल टिटोवर १९४८ सालीं घालण्यांत आलेल्या बहिष्काराबद्दल बेरियाला दोष देणें अगदींच हास्यापद होतें. स्लाव लोकांच्या भ्रातृभावनेचा उल्लेख करून मार्क्सवाद-लेनिनवादाच्या नांवाखालीं दोन कम्युनिस्ट पक्षांनीं एकत्र येण्याबद्दल बोलणें युगोस्लाव नेत्यांना रुचणारें नव्हतें. त्यांना विचारसरणीची चर्चा करावयाची नव्हती तर राजकीय व्यवहाराबद्दल बोलणीं करावयाचीं होतीं. क्रुश्चेवच्या या बोलण्याला कारणें असतीलहि तथापि झारशाहींतील असो वा कम्युनिस्ट असो, रशियानें बाल्कनमधील राष्ट्रांशीं बोलणीं करतांना अनेक वेळां दाखवलेला बेंधळेपणा आपण विसरतां कामा नये. क्रुश्चेव केवळ ' जीभ टाळयाला ' लावूनच बोलत होता असें नाहीं. बेंधळेपणा असो वा नसो, रशियन नेत्यांना कार्यभाग साधावयाचा आहे. अशा तऱ्हेनें ते पश्चात्ताप व्यक्त करूं लागले म्हणजे त्यांना काय हवें आहे, हा प्रश्न स्वाभाविकपणें उद्भवतो.

"मार्शल टिटोला वेगळा दृष्टिकोन स्वीकारावयास लावून किंवा तुर्कस्थान, ग्रीस आणि अमेरिका यांच्या मनांत त्याच्याविषयीं गैरसमज निर्माण करून त्याचे पाश्चात्त्य राष्ट्रांशीं असलेल्या संबंधांत दुरावा उत्पन्न करण्याची त्यांना आशा वाटत असावी. दोन गटांच्यामध्यें असलेल्या राष्ट्रांनीं तटस्थतेची भूमिका घेणेंच त्यांच्या हिताचें आहे. हा मुद्दा जर्मनी, मध्य व अतिपूर्वेकडील राष्ट्रें आणि कदाचित् इटली यांच्या मनांत या मार्गानें ठसविण्याचाहि हा प्रयत्न असावा. तथापि या बाबतींत पूर्वयुरोपांतील अंकित राष्ट्रांवरील पकड ढिली करून युगोस्लावियाच्या आधिपत्याखालीं बाल्कन राष्ट्रांची एकजूट होऊं देण्याच्या निकराच्या मार्गावांचून तें दुसरें काय करूं शकतात हें समजणें कठिण आहे. तथापि हा मार्ग अशक्यप्रायच आहे. युगोस्लाविया अर्धवट तटस्थ भूमिकेंत आहेच. आणि तसाच तो राहीलहि." –'मँचेस्टर गार्डियन' (३० मे १९५५)

" क्रुश्चेवला ( बेलग्रेडहून ) परत जातांना सोफिया आणि बुखारेस्ट या मार्गानें परत जाण्याची आवश्यकता कां वाटावी हें समजणें सोपें आहे. मात्र अंकित राष्ट्रांतील ( कम्युनिस्ट ) पक्षनेत्यांशीं त्याचें काय बोलणें झालें असेल याबद्दल आपण केवळ तर्कच करावयास हवा. अंकित राष्ट्रांतील नेत्यांना आपण स्वस्थानावर रहातों कीं जातों याबद्दल शंका येण्यासार-







ख्या कितीतरी घटना घडल्या आहेत. रशियन नेत्यांनीं बेलग्रेडला भेट दिली, टिटो - कोमिन्फॉर्म कलहाबद्दल बेरियाला दोष दिला, ही गोष्ट अंकित राष्ट्रांपासून गुप्त राखण्यांत आलेली नाहीं. तथापि तिला सहाजिक-पणेंच अगदीं किमान प्रसिद्धि व महत्त्व देण्यांत आलें आणि अखेरीस टिटोवाद हा देखील कांहीं झालें तरी समाजवादाच्या विकासाचाच एक सन्मान्य प्रयोग आहे अशी कबुलीहि दिली गेली आहे. रशियाच्या अंकित राष्ट्रांतील बहुतेक नेते टिटोवादी किंवा राष्ट्रवादाकडे झुकलेल्या पुढाऱ्यांचा निःपात उडवूनच अधिकारारूढ झाले आहेत. आणि लोकांत बदल व्हावा अशी कितीही इच्छा असली तरी प्रस्थापित परिस्थितींत कसलाहि बदल करण्याची कल्पना सत्तारूढ नेत्यांना मान्य होण्यासारखी नाहीं. उपलब्ध पुराव्याचा विचार करतां वास्तविकपणें अशा प्रकारचा बदल आजतरी फारसा शक्य कोटींतील वाटत नाहीं. रशियन नेत्यांच्या बेलग्रेड-भेटीचे अत्यंत मोठे परिणाम बहुधा पूर्व युरोपांतच दृष्टीस पडतील हें खरें आहे. तथापि, त्यांचें प्रमाण वा योग्य स्वरूप यांविषयीं आतांच अंदाज बांधतां येणार नाहीं. पूर्व युरोपांतील धोरणांत तडकाफडकीं बदल करण्याचा रशियाचा हेतु असावा असें समजण्यास कांहींच आधार नाहीं. आणि काहीं तरी तितक्याच महत्त्वाचा लाभ होण्याची शक्यता दिसल्यावांचून रशिया त्यासाठीं तयार होईल असेंहि दिसत नाहीं.

" टिटोनें रशियाचा अनुनय करण्यास स्पष्ट नकार दिला आहे. तथापि, त्यावरून रशियाच्या बेलग्रेड-भेटीपासून काय अपेक्षा होत्या हें गूढ उकलण्यास विशेष मदत होत नाहीं. मात्र स्वतःच्या करारी वृत्ती-मुळें आणि पाश्चात्त्य राष्ट्रांच्या पाठिंब्यामुळें टिटोच्या भूमिकेंत एक सामर्थ्य होतें व त्या सामर्थ्याच्या जाणिवेनें तो बोलणीं करूं शकला. युगोस्लाविया दुर्बल व एकाकी असतांना ज्याप्रमाणें त्यानें रशियाच्या दम-दाटीला भीक घातली नाहीं. त्याचप्रमाणें आतां देखील रशियाच्या आमिषांना तो बळी पडला नाहीं असें दिसतें "- ' इकॉनॉमिस्ट, ' लंडन, ११ जून १९५५.

## ब्रिटनमधील सार्वत्रिक निवडणूक

" आतांच निवडणुकी घेण्याचा सर अँथनी ईडन यांचा निर्णय, अधिक मोठें बहुमत त्यांना देऊन, आपणांस मान्य असल्याचें मतदारांनीं स्पष्ट केलें आहे. तथापि त्याबरोबरच अनेक महत्त्वाचे आंतरराष्ट्रीय प्रश्न पुढें येत आहेत. बड्या चौघांच्या बैठकीचें निमंत्रण रशियानें आतां औपचा-रिक रीतीनें स्वीकारलें आहे. इंडोचीनमधील परिस्थिति अजूनहि स्फोटक आहे. फॉर्मोसाचीहि तीच अवस्था आहे. या अडचणींचें निराकरण करणें निवडणुका झाल्यामुळें पूर्वीपेक्षां सोपें झालें आहे असें नाहीं. तथापि पुनश्च पांच वर्षांचा अवधि आणि पुरेसें बहुमत असलेलें सरकार अस्तित्वांत आल्यामुळें यशाची आशा निर्माण झाली आहे यांत शंका नाहीं. "- ' डेली टेलिग्राफ ' लंडन, २८ मे १९५५

" टोरी पक्षाला मिळालेलें ६० चें मताधिक्य अधिकारारूढ सरकारला आत्मविश्वास वाटण्याइतकें मोठें आहे. तथापि विरोधी पक्षाला हतबल होण्याइतकें वा वैफल्याच्या आहारीं जाण्याइतकें तें मोठें नाहीं. कॉमन्सचा कारभार सुरळीतपणें चालण्यास अडचण पडणार नाहीं. पण सरकारी पक्षानें काळजीपूर्वक वागणें आणि विरोधकांची दखल घेणें आवश्यक आहे. मजूर-पक्षाला वातावरण विरोधी होतेंच. त्याचा परिणाम म्हणून यापेक्षां अधिक भयंकर निकाल लागला नाहीं याबद्दल मजूर पक्षानें स्वतःचें अभिनंदन केलें पाहिजे."

– ' मँचेस्टर गार्डियन ' – २८ मे १९५५.

" मजूरपक्ष अधिकारारूढ होणारच. तथापि पुढारी व कार्यकर्ते ऐक्याच्या आणि स्नेहाच्या भावनेनें कित-पत वागतात यावरच आजच्या अपयशी परिस्थितीला प्रामाणिकपणें तोंड देणें अवलंबून आहे. आणि तसें झाल्यावांचून परिस्थिति पुनः सांवरली जाणार नाहीं. मजूरपक्षानें घ्यावयाचा बोध स्पष्ट आहे. अधिकारा-रूढ होण्यासाठीं कोणताहि पक्ष एकजुटीनें काम करणारा असला पाहिजे; आणि विरोधाच्या भूमिकेंत असतांना आपल्या रचनात्मक कार्याला लोकमत अनुकूल करून घेण्याचें सामर्थ्यहि त्याच्या ठिकाणीं हवें. " – ' डेली हेरल्ड ' २८ मे १९५५.

१३ जून १९५५ —गोवर्धन पारीख



अनुक्रमणिका







## पुस्तक-परामर्श

**राज्यकारभारविचार** – ले. श्री. न. वि. गाडगीळ प्रकाशक : चित्रशाळा-प्रकाशन (१९५५) पानें ४१२ किं. दहा रुपये.

' राज्यकारभारविचार ' हा राज्यप्रशासनावरील ग्रंथ मराठींतून प्रकाशित करून श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांनीं द्विविध कामगिरी बजाविली आहे. आतां मराठीमधूनच महाविद्यालयीन विषय शिकविण्याचा निर्णय जवळजवळ निश्चित झाला आहे. अशा काळामध्यें मातृभाषेंतून ग्रंथरचना करून ग्रंथकारानें माध्यमाचा प्रश्न सुकर करण्यास हात-भार लावलेला आहे व या विषयांतील पारिभाषिक शब्दांची अडचणहि कांहीं अंशीं दूर केली आहे. लोकशाही राज्यामध्यें राज्यप्रशासनाचें स्थान माना-चें मानावें लागेल. कोणत्याहि राज्यांतील लोकशाहीचें अधिष्ठान सुस्थिर करावयाचें कीं तें अधिष्ठान उखडून टाकायचें हें कांहीं अंशीं तरी तेथील राज्यप्रशासनावर अवलंबून आहे. राज्यकारभारामधील अधिकारी वर्ग देशाच्या घटनेशीं वा संसदेशीं एकनिष्ठ न राहिला तर त्या घटनेचा वा संसदेचा डोलाराच कोसळून पडेल. जर्मनीमधील वैमार घटना याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. त्यामुळें आपल्या लोकशाहीच्या संवर्धनासाठीं तर आपल्याकडील प्रशासनाचा आपणास काळजीपूर्वक अभ्यास केला पाहिजेच. त्यांत पुन्हां या देशामध्यें उत्क्रान्त होत चाललेल्या लोककल्याणकारी राज्याच्या अंमलामुळें आणि हळूंहळूं नियोजनाच्या पसरत चाल-लेल्या प्रभावामुळें तर या राज्यकारभार करणारांवरील जबाबदारी वाढली आहे. म्हणून विषयपरिचयाच्या दृष्टीनेंहि हा ग्रंथ महत्त्वपूर्ण झाला आहे.

' राज्यकारभार – विचार ' या ग्रंथामध्यें काका-साहेबांनीं प्रशासनाच्या बहुविध अंगांचा सांगोपांग विचार केला असून वाचकांना या विषयाचें सर्वांगीण दर्शन घडविण्यांचा प्रयत्न केला आहे. प्रारंभींच त्यांनीं " राज्यकारभार म्हणजे काय ? " याची चांगली चर्चा करून पुढें राज्यकारभारांतील संघटन व मानवी वर्तन, संघटनेची घडण, कार्य–विभागणी, संघटना व अन्तर्गत संबंध, या क्षेत्रांतील नियोजनाची आवश्यकता, कारभा-रांतील कार्यक्षमता इत्यादि विषयांचा सविस्तर ऊहापोह केला आहे. या विविध अंगांचा परिचय करून देतांना त्यांचे परस्परसंबंध किती निगडित आहेत हें दाखवून देऊन वाचकाला या राज्यकारभाराचें समग्र व सम्यक् दर्शन घडविण्याचा प्रयत्न केला आहे.

ग्रंथकर्त्यांची राज्यशास्त्रविषयक तात्त्विक विचारांची बैठक यापूर्वींच पक्की झालेली आहे. त्यांच्या या तात्त्विक ज्ञानाला राज्यकारभाराच्या प्रत्यक्ष अनुभवाची जोड मिळाल्यामुळें विवेचनांत ताजेपणा अगर जिवंतपणा आला आहे. हें या ग्रंथाचें एक खास वैशिष्ट्य म्हणून उल्लेखितां येईल.

राज्यकारभाराच्या विविध अंगोपांगांचा विचार करतांना लेखकानें कांहीं ठिकाणीं महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं राज्यप्रशासना-मध्यें अधिकारी वृत्ति गाजविण्याची चमत्कारिक चटक सर्व वरिष्ठ नोकरवर्गाला लागली होती. सार्वभौम सत्तेचें अधिष्ठान समजल्या जाणाऱ्या सामान्य नागरि-कावद्दल उच्च सनदी नोकरामध्यें उपेक्षेची अगर किंचित् तिरस्काराची भावना असेच. परंतु हाताखाल-च्या दुय्यम अधिकाऱ्यांना देखील अपमानास्पद वागणूक देण्यांत त्यांना फारसें वावगें वाटत नसे. परंतु आतां पूर्वींचें पोलीस-राज्य जाऊन तेथें लोककल्याणकारी राज्य उदयाला येत आहे. या काळांत अधिकारी वर्गानें परिस्थितीप्रमाणें आपल्या मानसिक घडणीमध्यें देखील बदल करावा अशी महत्त्वपूर्ण सूचना काकासाहेबांनीं केली आहे. लेखकांनीं या बाबतीत स्वतः केलेल्या प्रयोगाचा उल्लेख करून म्हटलें आहे : " प्रस्तुत लेखकानें आठवडयांत सर्व प्रमुख अधिकाऱ्यांनीं आप-आपल्या कक्षेंतील अधिकाऱ्यांना भेटावें व त्यांच्याशीं कामासंबंधीं विचारविनिमय करावा अशी प्रथा मंत्रालयांत सुरू केली व त्याचे परिणाम चांगले झाले असें नजरेस आलें. हाताखालील अधिकाऱ्याबरोबर विचारविनिमय करणें यांत अनेकांना कमीपणा वाटतो. पण हें चूक आहे. विचार – विनि-मय हा लोकशाही राज्यकारभाराचा आत्मा आहे " ( पा. ८४ )

नियोजन हा आजचा युगधर्म आहे. हळूंहळूं राज्याचीं विविध अंगोपांगें नियोजन हळीं व्यापून टाकीत आहे. काळाची ही गरज ओळखून ग्रंथकारां-नीं ' नियोजनाची आवश्यकता ' या प्रकरणामध्यें नियोजन आणि राज्यकारभार यांच्या परस्परसंबंधाचा







विचार केला आहे. दोन्हींमध्यें सहकार अथवा संवादित्व राखणें हें यशस्वी राज्याचें एक महत्त्वाचें लक्षण आहे. हा विचार मांडीत असतांना ते म्हणतात : " अर्थ व शब्द याप्रमाणें नियोजन व कारभार यांचे संबंध असले पाहिजेत. त्यांत मानसिक अगर बौद्धिक एकलकोंडेपणा नसावा. दोन्ही मिळून एक भावना रचली जात आहे अशी समवायात्मक दृष्टि असली पाहिजे. म्हणजेच नियोजनाचें यश व राज्यकारभाराची कार्यक्षमता प्रस्थापित होते " (पा. ३२२). त्याचप्रमाणें राज्यकारभारांतील संघटन व मानवी वर्तन, संघटनेची घडण इत्यादि महत्त्वाच्या विषयावर काकासाहेबांनीं उद्बोधक आणि चिकित्सक विवेचन करून, संघटनेंतील समतोल, कारभार व कार्यक्षमता; अंमलबजावणीचा मार्ग इत्यादि विविध बाजूंची उपयुक्त चर्चा केली आहे.

ग्रंथकारानें राज्यप्रशासनावरील विविध अंगांवर बोधप्रद सूचना केलेल्या असल्या तरी त्यांत देखील पूर्णता येण्याच्या दृष्टीनें कांहीं उणीवा आपल्याला जाणवल्यावांचून रहात नाहींत. उदाहरणार्थ, आज आपल्या राज्यकारभारामध्यें दोन मूलभूत स्वरूपाच्या समस्या आहेत. आपल्या राज्यकारभाराची घडण एखाद्या पिरॅमिडप्रमाणें आहे. तळाशीं खूप रुंद व वर एकदम निमुळतें अशा आपल्या राज्यप्रशासनाची घडण असल्यामुळें दोन प्रकारचे दोष संभवतात : अगदी खालच्या ऑफिसांतील साधारण महत्त्वाचें प्रकरण देखील अगदीं खालून थेट वर सेक्रेटरी-कार्यालयापर्यंत प्रवास करीत जातें व तेथेंच त्याचा अखेरचा निर्णय लागतो. त्यामुळें प्रांताच्या मुख्य सचिवालयांत शेंकडों प्रकरणें सतत जमत असतात. हीं प्रकरणें स्वतः अधिकाऱ्यानें वाचून निर्णय द्यायचा तर प्रदीर्घ कालावधि, न वाचावीं तर अर्जदारांवर अन्याय अशी ही श्रृंगापत्ति आहे. यासाठीं आजच्या आपल्या राज्यप्रशासनाची घडणच बदलून त्यांतील हें केंद्रीकरण कमी करावें असा विचार कांहीं विचारवंतांकडून मांडला जातो. या मूलगामी प्रश्नाबाबत ग्रंथकारांनीं आपले विचार व्यक्त केले असते तर बरें झालें असतें. त्याचप्रमाणें आजच्या सनदी नोकराबाबतचें सरकारी धोरण कितपत न्याय्य आणि समर्थनीय आहे याबद्दल अभ्यासूंचीं मनें साशंक आहेत. उदा०, आजचे सनदी नोकर विशिष्ट विषय घेऊन बी. ए. अगर एम्. ए. होतात आणि नंतर आय्. ए. एस्. ची परीक्षा उत्तीर्ण होतात. या परीक्षांच्या वेळीं त्यांचे विषय ठरलेले असतात. या परीक्षांमध्यें उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाल्यानंतरच त्यांची या खात्यासाठीं निवड होते यांत शंका नाहीं. तथापि विद्यमान परिस्थितीप्रमाणें एंजिनिअरिंगचा विषय घेऊन पास झालेल्या सनदी नोकराला इनकम् टॅक्सच्या खात्यांत काम करावें लागते अगर संस्कृत घेऊन उत्तीर्ण झालेल्या नोकराला अर्थखात्यांत नोकरी करावी लागते. शिवाय हा सनदी नोकर त्या क्षेत्रांतील तज्ज्ञ म्हणून भराभर निर्णय देत असतो. शिवाय असे सनदी नोकर सर्वज्ञ आहेत असें मानून त्यांची तीन अगर पांच वर्षांनीं कोणत्याहि खात्यामध्यें सतत बदली होत असते. यामुळें या सनदी नोकरांमध्यें तज्ज्ञत्वा (specialization) – चा अधिकार येणें बरेंच कठीण असतें. निरनिराळ्या खात्यांमध्यें सतत फिरणारे हे सनदी नोकर सर्वत्र त्यांतील विशारद म्हणून निर्णय देत असतात. हा विरोधाभास राज्य–प्रशासनांतील कार्यक्षमतेच्या दृष्टीनें चिंतनीय आहे. काकासाहेबांसारख्या राज्यकारभाराचा अभ्यास केलेल्या व प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या तज्ज्ञांनीं यावर प्रकाश टाकला असता तर बरें झालें असतें.

राज्यप्रशासनासारख्या गंभीर आणि रूक्ष विषयावरील विवरण काकासाहेबांनीं रंजक आणि उद्बोधक केलें आहे. विशदीकरणामध्यें जागजागीं उपयोजिलेल्या विविध उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टान्त यांमुळें हा ग्रंथ वाचतांना कोठेंहि कंटाळवाणा अगर बोजड वाटत नाहीं. राज्य-प्रशासनासारख्या महत्त्वाच्या विषयाचा आपल्या अर्थवाही आणि वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें वाचकांना परिचय करून देऊन राज्यशास्त्रीय वाङ्मयांत प्रस्तुत ग्रंथाच्या रूपानें मोलाची भर घातल्याबद्दल लेखकाचें व प्रकाशकांचें मनःपूर्वक अभिनन्दन.

—मा. प. मंगुडकर







अनुक्रमणिका





Regd. No. B. 5177

# Enemy Sighted . . .

Here in a modern laboratory, a pathologist probes into the secret life of the enemy — a disease germ. There in a dark room, a nuclear scientist traces the rapid passage of a radio-active particle. A few streets away in a dimly lit chawl, a social worker tries to unravel the distressing problems of a day labourer.

The scientist in India today is doing a vital job to promote the physical and social health of the Nation. He opens the door to a wider knowledge of the world we live in. Though many victories have been won in the scientific field, there is yet much to learn and much to achieve.

The Indian Institute of Science at Bangalore stands out as a monument to the founder of the House of Tata, symbolising his ideal of philanthropy. The National Metallurgical Laboratories at Jamshedpur, the Cancer Hospital, the Institute of Social Sciences and the Institute of Fundamental Research in Bombay, and the National Chemical Laboratory at Poona, demonstrate that the tradition established by the Founder still prevails.

Research as the handmaid of industry is the concept which pervades all Tata enterprises.



*Tata contributions to our national life include:*

Steel . Textiles . Hydro-Electric Power . Chemicals . Locomotives & Engineering
Soaps, Glycerine and Edible Oils . Hotels . Machine Tools . Radios . Insurance
Cement . Industrial Investment . Social Sciences . Scientific Research.

## TATA INDUSTRIES LIMITED

TSL. 5748